






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका



संपादक : प्र.ना. परांजपे
संपादन-सल्लागार : अशोक रा. केळकर, गं.ना. जोगळेकर, मॅक्सीन बर्नसन, अंजली सोमण
संपादन-समिती : प्र.ना. परांजपे (प्रमुख), विजया देव, मृणालिनी शहा, नीलिमा गुंडी
मुखपृष्ठ/विनय सायनेकर, सुप्रिया खारकर
संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके : प्र.ना. परांजपे, सी-१, सुरजबन सहनिवास, गणेशखिंड मार्ग, पुणे ४११ ००७. दूरध्वनी (०२०) २५६९४६१७
प्रकाशक, मुद्रक, व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा : नीलिमा गुंडी, कार्यवाह, 'मराठी अभ्यास परिषद' ३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५, वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११००२. दूरध्वनी (०२०) २४४८६०१५
मुद्रण-स्थळ : भंडारी मुद्रणालय, सिंहगड मार्ग, पुणे ५१. दूरध्वनी (०२०) २४३४८७५६
प्रकाशन : त्रैमासिक; जानेवारी(हिवाळा), एप्रिल(उन्हाळा), जुलै(पावसाळा), ऑक्टोबर(दिवाळी)
सूचना : (१) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या/लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही. (२) **या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी साहित्य संस्कृती मंडळ व राज्यशासन सहमत असतीलच असे नाही.**

**या अंकाचे मूल्य रु. २५/-**

# संक्षिप्त रूपे : भाषिक काटकसर आणि सर्जकता

काटकसर करणं हा मानवी स्वभाव आहे. श्रमाची कामं, आर्थिक व्यवहार करताना या स्वभावाचा आपल्याला पदोपदी प्रत्यय येतो. भाषेच्या व्यवहारातही माणूस काटकसर करत असतो; पण ती त्याला किंवा इतरांना जाणवतेच असं नाही. पत्र लिहिताना 'ती.', 'चि.', 'कु.', 'सौ.', 'स.' (किंवा सा.) न.वि.वि.' अशी संक्षिप्त किंवा लघुरूपं वापरली जात ती शब्दांची, पत्रातील जागेची आणि लिहिण्याचे श्रम, वेळ यांची काटकसर करण्यासाठीच !

आद्याक्षरांच्या वापरातही हेच तत्त्व कार्यरत असलेलं दिसतं. आद्याक्षरं म्हणजे आद्य + अक्षर. 'आद्य' म्हणजे पहिला, आरंभीचा, सुरुवात करणारा. (या शब्दाला आदिपुरुष, परमेश्वर, सर्वोत्कृष्ट, प्रमुख असे इतरही अर्थ आहेत. पण आत्ताच्या संदर्भात ते अप्रस्तुत आहेत.) ब्रिटिश राजवटीत नावे पूर्ण लिहिण्याऐवजी (काटकसर करून !) त्यांची आद्याक्षरे लिहिण्याची पद्धत सुरू झाली – म्हणजे अशोक रामचंद्र केळकर याऐवजी 'अ.रा.' किंवा 'ए.आर.' केळकर असे लिहिले जाऊ लागले. खरे तर मराठी परंपरेतही नावांचे संक्षिप्तीकरण होई, पण ते वेगळ्या प्रकारे. उदा० 'खंडो बल्लाळ', 'सखाराम बापू', 'दादोबा पांडुरंग' इत्यादी. म्हणजे आडनावे किंवा उपनामे यांची काटकसर केली जाई. याला काही प्रमाणात अपवाद ठरायची ती गावांवरून पडलेली आडनावे – उदा० पासलकर, जात व व्यवसायावरून आलेली आडनावे– उदा० चोखा महार, सेना न्हावी, गोरा कुंभार, सावता माळी, आणि हुद्दा, पदवी अशा स्वरूपाची आडनावे – उदा० नाईक, फडणीस, कुलकर्णी, पाटील, देशपांडे इ० त्यामुळेच आजही रामदास-तुकारामांची आडनावे आपल्या जिभेच्या टोकावर चटकन येत नाहीत; प्रयत्न करून ती आठवावी लागतात. ब्रिटिश राजवटीत मात्र काटकसर करून नावांची आद्याक्षरे वापरण्याची प्रथा रूढ झाली.

ब्रिटिशांनी सुरू केलेल्या शिक्षणपद्धतीतील पदव्यांसाठीही आद्याक्षरेच वापरली जातात. एस.एस.सी., बी.ए., एम.ए., एम.फिल., पीएच.डी., एम.बी.बी.एस., एम.एस., एम.डी., एलएल.बी., एलएल.एम., बी.इ., एम.इ., एम.बी.ए. इत्यादी. या पदव्या देवनागरीत लिहिल्या तरी त्यांचे मराठीकरण झालेले नाही. त्यांचे

मराठीकरण करून त्यांची आद्याक्षरे रूढ होणे सध्या तरी अवघड दिसते. 'शालान्त परीक्षा' परिचित असली तरी 'शा.प.' कुणाला कळणार नाही. 'आयुर्वेदविद्या पारंगत' परिचित वाटले तरी 'आ.वि.पा.' (किंवा 'आ.प.') मात्र रूढ नाही. (एखाद्या उत्साही मराठी व्यक्तीने किंवा संस्थेने पदव्यांचे मराठीकरण करून त्यांची आद्याक्षरे रूढ करण्याचा प्रयत्न करायला हरकत नाही. अडचण येईल ती फक्त त्यांच्या आंतरराज्यीय व आंतरराष्ट्रीय आकलनाची !) सध्या तरी पदव्यांची इंग्रजी आद्याक्षरे मराठीच आहेत, असा समज आहे असे दिसते.

भाषेच्या काटकसरीच्या वापराचे तत्त्व ब्रिटिशपूर्व इतिहासकाळातही वापरले जात होतेच. महानुभाव वाङ्मय, पत्रवाङ्मय, बखरी यांमध्येही अनेक संक्षिप्त रूपे आढळतात. उदा० 'प्र' = प्रसन्न, 'अ' = अध्याय. यादवांच्या काळात म्हणजे १३व्या शतकात, द्रुतगतीने लिहिता यावे म्हणून हेमाडपंतांनी मोडी लिपी सुरू केली. तिच्यात अनेक शब्दांसाठी संक्षिप्त रूपे वापरली जात. उदाहरणार्थ,

| | | |
|---|---|---|
| सोा = साहेब | वीाा = विनंती | पैाा = पैकी |
| ताा = तालुका / तारीख | रुाा = रुपये | मुाा - मुक्काम |
| बोा = बरोबर / बद्दल | बाा = बद्दल | |

एकोणिसाव्या शतकात मुद्रणास प्रारंभ झाला त्या वेळी सुरुवातीला ग्रंथमुद्रण मोडीतच होई. गोडसे भटजींचे 'माझा प्रवास', 'बायबल' ही अशी काही पुस्तके. आज ती वाचताना मोडी लिपीप्रमाणे तिच्यातील संक्षिप्त रूपांचाही अडसर अनुभवावा लागतो. आता देवनागरी लिपीतही अनेक संक्षिप्त रूपे वापरात आहेत. प्रारंभी दिलेल्या 'स.न.वि.वि.' 'ता.क.' इ० व्यतिरिक्त पुढील संक्षिप्त रूपे व संस्थानामे आपल्या परिचयाची असतात : वि.सू. (विशेष सूचना), उ.नि. (उपरिनिर्दिष्ट), म.न.पा. (महानगरपालिका), म.सा.प. (महाराष्ट्र साहित्य परिषद), टि.म.वि. (टिळक महाराष्ट्र विद्यापीठ), को.ब्रा. (कोकणस्थ ब्राह्मण). बऱ्याच राजकीय पक्षांच्या नावांचे उल्लेख (मौखिक व लेखी) आपण संक्षिप्त रूपे वापरूनच (बसपा, शेकाप, भाजप) करतो. आता तर हिंदी चित्रपटांची नावेही संक्षिप्त केली जातात. एच्.ए.एच्.के. (हम आपके है कौन ?) एम्.पी.के. (मैनें प्यार किया), डी.डी.एल्.जे. (दिलवाले दुल्हनिया ले जायेंगे) इ०इ० एवढेच नव्हे, तर संक्षिप्त रूपांवरून विनोद (तरुणांच्या भाषेत 'पी.जे.' - पुअर जोक) करून या काटकसरीचं रूपांतर भाषिक सर्जकतेत झालेलंही पाहायला मिळतं. 'सासू' (= सारख्या सूचना), 'सून' (=सूचना नकोत), 'भाजी' (= भाषा आणि जीवन) ही संक्षिप्त रूपं अशा भाषिक 'सर्जकतेचा' पुरावाच. पूर्वी वा.म. जोश्यांच्या 'इंदू काळे आणि सरला भोळे' या पत्रात्मक कादंबरीचा उल्लेख





अनुक्रमणिका

तिच्यात वारंवार येणाऱ्या 'ता.क.'मुळं 'ताकभाता'ची कादंबरी असा केला जाई !

संक्षिप्तीकरणाच्या या प्रवृत्तीला भ्रमणध्वनीवरील लुघपटावर मावणारे संदेश (एस्.एम्.एस्.) पाठवण्याच्या गरजेमुळे आता बहर आला आहे. इतके दिवस असे संदेश रोमन लिपीतूनच पाठवता येत. त्यामुळे 'u (= you), 'y' (= why), 'ur' (= your), 'gud' (good), 'G.M.' (good morning), '4u' (for you)' अशी नेहमीच्या संदेशांची संक्षिप्त रूपे तयार झाली. एवढंच नव्हे तर अशा संक्षिप्त संदेशांचे लघु आकाराचे (१ इंच×१॥ इंच) शब्दकोशही प्रकाशित झाले. या संक्षिप्तीकरणामुळे इंग्रजी शब्दांची स्पेलिंग्ज बदलत आहेत, भ्रष्ट होत आहेत अशा तक्रारीही सुरू झाल्या आहेत. याउलट इंग्लंडमधील काही शिक्षणसंस्थांनी या संक्षिप्त स्पेलिंग्जचा उपयोग परीक्षेतील उत्तरपत्रिकांमध्ये करण्याची परवानगी दिली आहे. भ्रमणध्वनींवरून संदेश पाठवताना देवनागरी लिपी वापरण्याचे तंत्रज्ञान आता उपलब्ध झाले आहे. त्याचा मराठी लेखनावर परिणाम होईल का, झाल्यास त्याचे स्वरूप काय असेल हे आत्ताच सांगता येणे अवघड आहे. इंग्रजीचे श्रवण व लेखन यात बरेच अंतर असल्याने श्रवणप्रत्ययी स्पेलिंग्ज वापरून काटकसर करण्यास इंग्रजीत खूप वाव आहे. तसे मराठीत नाही. मराठीचे बहुतांश लेखन एरवीही श्रवणप्रत्ययी असल्याने संक्षिप्ती-करणाला फारसा वाव नाही.

अर्थात असे आत्ता वाटते आहे; पण तरुणांची सर्जक भाषिक क्षमता कोणती रूपे घेते हे फक्त काळच सांगू शकेल ! ■

**मृणालिनी शहा**
**प्र.ना. परांजपे**

---

**मुखपृष्ठासंबंधी :** 'भाषा आणि जीवन'च्या रौप्यमहोत्सवी वर्षातील (व नंतरच्याही) अंकांच्या मुखपृष्ठांवर महत्त्वाच्या भाषाभ्यासकांना सादर करीत आहोत. सुरुवात मराठीपासून – मोरे\ केशव दामल्यांपासून.

**मोरो केशव दामले** (१८६८ - १९१३) हे कवी केशवसुतांचे धाकटे बंधू. बी.ए. (तर्कशास्त्र) व एम.ए.(तत्त्वज्ञान व इतिहास). ते उज्जयिनीच्या माधव महाविद्यालयात प्रोफेसर व नागपूरच्या नील सिटी हायस्कूलचे प्राचार्य होते. सुटीत पुण्याला जात असताना अपघातात मृत्यू.

'न्यायशास्त्र-निगमन' व 'न्यायशास्त्र-विगमन' हे दोन ग्रंथ. एडमंड बर्कच्या भाषणांचा मराठी अनुवाद. सुमारे १००० पृष्ठांचा 'शास्त्रीय मराठी व्याकरण' (१९११) हा ग्रंथ. मराठी व्याकरणावर असे काम दामल्यांपूर्वी कुणी केलेले नाही. त्यांच्यानंतरही नाही.

---



अनुक्रमणिका

# तुका बैसला विमानीं

विश्वनाथ खैरे

ज्ञानेश्वर-तुकारामांसारख्या संतपुरुषांनी केलेल्या चमत्कारांच्या कथा मराठी समाजात इतिहासकाळापासून चालत आल्या आहेत. ज्ञानेश्वरांच्या नावावरचे चमत्कार त्यांच्या साहित्यातील काही उल्लेखांच्या शब्दरूपांचे वेगळेच अर्थ लावून उभे केले असावेत हे पूर्वी (*'ज्ञानेश्वरांचे चमत्कार'* विश्वनाथ खैरे, संमत प्रकाशन, पुणे. १९९६) या पुस्तकात दाखवले आहे.

तुकारामांच्या गाथेतील *''स्वामींनी काया ब्रह्म केली ते अभंग ।२४।''* या मथळ्याखालील १५८६ ते १६०९ या चोवीस अभंगांतील शब्दरूपाच्या आधाराने तुकारामांच्या निर्याणाच्या तपशिलाविषयी अधूनमधून चर्चा होत असते. तुकारामांच्या अंतकाळी स्वर्गातून विमान आले आणि त्यात बसून तुकाराम वैकुंठाला गेले अशी चमत्कारांच्या पातळीवरची लोकसमजूत आहे. (यातले विमान हे आजकालच्या लोकांच्या मनात अर्थातच गेल्या शंभर वर्षांत जी मानवनिर्मित विमाने आकाशात संचार करीत आहेत त्यांच्यासारखेच असते.) या समजुतीचे मूळ या चोविसांपैकी १६०७ क्रमांकाच्या अभंगात दिसते :

तुका उतरला तुकीं । नवल जालें तिहीं लोकीं ।१।
नित्य करितों कीर्तन । हेंचि माझें अनुष्ठान ।छ।
तुका बैसला विमानीं । संत पाहाती लोचनीं ।२।
देव भावाचा भुकेला । तुका वैकुंठासी नेला ।३।

हा अभंग तुकारामांचाच असला तरी स्वतःच्या निर्याणाचे यथाभूत वर्णन स्वतः तुकाराम करू शकणार नाहीत एवढे मान्यच करावे लागेल. त्यामुळे या अभंगातले वर्णन 'आपुले मरण पाहिलें म्यां डोळां' यासारखे प्रतीकात्मकच म्हणावे लागेल. ज्या गटात हा अभंग आला आहे त्यातल्या इतर अभंगांचा बारीक विचार केला तर हा निष्कर्ष आणखी दृढ होतो. थोडक्यात सांगायचे तर, या गटातल्या चोवीस अभंगांचे (१) कीर्तनाची महती (२) विठ्ठल हे माहेर (३) विठ्ठलाची भेट (४) विठ्ठल प्राणेश्वर

(५) वैकुंठगमन, असे पाच विभाग पडतात. या सगळ्यात व्यवहारातली रूपके आहेतच; शिवाय, कीर्तनाचा संदर्भ कायमच आहे. 'नित्य करितों कीर्तन । हेंचि माझें अनुष्ठान ।' या चरणांत तो संदर्भ याही अभंगात आहेच. असे असले तरी अंतकाळी विमान येण्याची समजूत तुकारामांच्या काळात होतीच. त्यामुळे 'तुका बैसला विमानीं' हे तथ्याचे विधान नसले तरी तुकारामांनाही लोकसमजुतीतले विमानच अभिप्रेत होते असे म्हणता येईल.

याचे कारण, ही समजूत बऱ्याच जुन्या काळापासून चालत आली आहे. 'वाल्मीकी रामायणा'ची रचना करणाऱ्या कवीच्या काळातही ती होती, हे त्या महाकाव्याच्या उपान्त्य सर्गावरून दिसते. उत्तरकांडाच्या त्या ११०व्या सर्गात स्वतः रामाच्या निर्याणाचे वर्णन आहे : ''प्रजेसह राम सरयू नदीवर आला. त्या वेळी सर्व देव आणि ऋषींसह शतकोटी विमानांनी वेढलेला ब्रह्मदेवही तेथे आला (विमानशतकोटिभिः दिव्यैः अभिसंवृतः ।४।). अंतरिक्षातून त्याने रामाला सांगितले, ''तू भावांसह विष्णूच्या तेजात सदेह प्रवेश कर.'' (विवेश वैष्णवं तेजः सशरीरः सहानुजः ।१२।) त्यानंतर विष्णूच्या सांगण्यावरून ब्रह्मदेवाने इतरांनाही तेच वरदान दिले. त्यामुळे सरयूच्या पाण्यात बुचकुळी मारून जो तो प्राणत्याग करून आनंदाने मानवी देह टाकून विमानात चढला (अवगाह्य अप्सु यो यो वै प्राणान् त्यक्त्या प्रहृष्टवत् ।२३। मानुषं देहम् उत्सृज्य विमानं सः अध्यरोहत ।२४।).''

हे सारे खरेच घडले होते असे नाही. पुण्यवान व्यक्तींसाठी त्यांच्या मरणवेळी देवाचे विमान त्यांना न्यायला येते अशी समजूत समाजात होती, तिच्या अनुरोधाने रामाच्या संबंधाने कवीने तसेच वर्णन केले. समाजातली समजूत पिढ्यानपिढ्या कायम राहिली. प्रत्यक्षात विमान कधी आले नाही तरी तसे ते येते असे मानण्यातून 'पुण्यवंताच्या मरणवेळचे त्याच्या देहाचे जे वाहन' त्यालाच विमान असे भाषेत म्हणू लागले. स्मृतिस्थळ या महानुभाव ग्रंथातील स्मृती २६० मध्ये भटोबासांच्या निधनाचे वर्णन आहे, (तुळपुळे १९८६, पृ. ८७) त्यात 'विमान' हा शब्द या दुसऱ्या अर्थाने वापरला आहे.

> ''मग भटोबासीं म्हणितलें : 'आतां कोण्ही बोलों नको : रडों नको : अवसान जालेयां पाहार दीं हात लावों नको : आतां मी श्रीचक्रधरा बाइसांचेया देवातें आठवितों : ऐसें म्हणौनि निजैले : आणि निगाले : मग वासनिकीं विमान केलें : विमानिं ताटतांबीये लाविले : वोवाळनिया घातलिया : वाद्यें लाविलीं : यैसें गंगेचिये थडिये आणिले : योगुसंस्कार केला : शके ।१२२४।

सुभकृत नाम संवत्सरे : भाद्रपद वधि द्वादसि : भटोबासांसि ईश्वरदर्शन जालें : [हा उतारा शं.गो. तुळपुळे यांच्या 'महानुभाव गद्य' (व्हीनस प्रकाशन, पुणे. १९८६, पृ. ८४) यामधून घेतला आहे. त्यामध्ये वासनिक = उपदेशी, संन्यासदीक्षा घेण्याची इच्छा असणारा; आणि विमान = प्रेतवाहक डोलारा असे अर्थ दिले आहेत. शं.गो. तुळपुळे व ॲन फेल्डहाउस यांच्या 'डिक्शनरी ऑफ ओल्ड मराठी' (पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९९९) मध्ये ''विमान=३ प्रेत नेण्याचे वाहन; ए कन्व्हेयन्स फॉर कॉर्प्सेस, ए हर्स. स्मृ. २६०'' अशी नोंद आहे.]

रामायणरचनेपासून महानुभावांच्या आणि पुढे तुकारामांच्या काळापर्यंत 'विमान'चे दोन्ही अर्थ संदर्भानुसार प्रचारात राहिले. 'काया ब्रह्म केली' या संदर्भात 'तुका बैसला विमानीं' याचा अर्थ 'मृतदेह वाहनात बसवला' इतकाच असू शकतो. ■

३७४, सिंध सोसायटी, औंध, पुणे 411 007.

# विभक्तिविचार : शास्त्राची कार्यपद्धती

कृष्ण श्री. अर्जुनवाडकर

*[पार्श्वभूमी : दि. १ मे २००६ या दिवशी 'मराठी व्याकरणाचा पुनर्विचार' या विषयावर म.सा.प. संस्थेच्या सभागृहात जी चर्चासभा झाली, तीत वाचण्यासाठी मी वरील प्रस्तुत निबंध लिहिला. तो प्रस्तुत कालिकाचे संपादक प्रा. प्र.ना. परांजपे यांच्या सूचनांनुसार संक्षेप आणि परिवर्धन करून आता पुनर्घटित स्वरूपात मांडला आहे. या चर्चासभेसाठी विषयभूत म्हणून मानलेला प्रा. उमाकांत कामत यांचा लेख प्रस्तुत कालिकात प्रकाशित झालेला (उन्हाळा २००६) आहे. माझ्या निबंधात कामतांच्या लेखातल्या मतांचा साक्षात् परामर्श केलेला नाही; नियुक्त विषयावर माझे विचार अन्वयमुखानं मांडले आहेत. प्रस्तुत पुनर्घटित स्वरूपातल्या लेखाच्या परिशिष्टात संपादकांच्या अपेक्षेनुसार प्रा.कामतांचे विचार स्पष्ट रूपानं मांडून त्यांचा परामर्श केला आहे.]*

**प्रत्यय एक, अर्थ अनेक**

एकच प्रत्यय वाक्यरचनेनुसार अनेक कारकार्थ प्रकट करू शकतो. क्रियापदांहून अन्य वाक्यघटकांशी जो संबंध विभक्तिप्रत्ययांनी बोधित होतो, त्याला दामले 'उपपदार्थ' अशी संज्ञा देतात. एक प्रत्यय, एक अर्थ, – अशी व्याकरणाची भूमिका नाही, असूच शकत नाही. प्रत्ययाचे कोणते अर्थ कोणत्या टप्प्याला शिकवायचे हा शिक्षणव्यवहाराचा भाग आहे. कारकसंज्ञक अर्थांखेरीज क्रियापदभिन्न वाक्यघटकांचा एकमेकांशी संबंध हेही प्रत्ययार्थाचं क्षेत्र आहे; त्यात प्रामुख्यानं षष्ठीचा विचार येतो. 'एकशतं हि षष्ठ्यर्थाः' (षष्ठीचे अर्थ किती ? शंभर.) अशी म्हण संस्कृत व्याकरणाच्या परंपरेत रूढ आहे. याचा अर्थ असा की कर्ता, कर्म इत्यादी कारकार्थ हे वाक्याचे मूलभूत घटकावयव आहेत. अशा अर्थांची संख्या प्रत्यक्ष अनुभवाच्या आधारावर वाढू शकेल. व्याकरण हा नैसर्गिक भाषा शिकण्याचा मार्ग नव्हे, तिची बांधणी समजून घेण्याचा आहे. लहान मूल भाषा शिकतं ते मोठ्या माणसांचं बोलणं वारंवार ऐकून आणि त्याचं अनुकरण करून. या आधीच येत असलेल्या भाषेचं कुवतीनुसार विश्लेषण करण्याचं शिक्षण म्हणजे व्याकरण या शास्त्रीय विषयात पदार्पण होय.





अनुक्रमणिका

**व्याकरणात अर्थविचाराचं स्थान**

व्याकरणात अर्थविचार मर्यादित असतो. अभिधा, लक्षणा, व्यंजना असे शब्दशक्तीचे तीन प्रकार, आणि त्यांना अनुरूप असे वाच्य, लक्ष्य, व्यंग्य असे अर्थाचे तीन वर्ग संस्कृत परंपरेत, काव्यशास्त्रात केले जातात. ते प्रत्येकच भाषेला उपपन्न आहेत. त्यापैकी व्याकरणाला कर्तव्य केवळ अभिधेशी आणि वाच्यार्थाशी असतं, आणि तेही मुख्यतः प्रत्ययांच्या अर्थांपुरतं मर्यादित असतं. प्रकृतीच्या (मूळ शब्दाच्या) रूपाचा परिणाम अर्थावर होत असेल तरच व्याकरण प्रकृत्यर्थाची दखल घेतं. *उप-स्था* धातू 'जवळ जाणं' अशा अर्थी परस्मैपदी प्रत्यय घेतो (भर्तारम् उपतिष्ठति), 'पूजा करणं' अशा अर्थी आत्मनेपदी (आदित्यम् उपतिष्ठते). याची पाणिनीनं दखल घेतली आहे (अष्टाध्यायी १.३.२५). मराठीत 'गाळण (उडाली)' आणि '(चहाचं) गाळणं' ही यासारखी जोडी आहे. ('वळण/वळणं' ही अशी दुसरी जोडी.) यापैकी पहिल्या शब्दात स्वराघात (accent) दुसऱ्या अक्षरावर (ळ), तर दुसऱ्या शब्दात तो तिसऱ्या अक्षरावर (ण) आहे. (दुर्दैवानं मराठी परंपरेत स्वराघात हा विषय व्याकरणाचा मानला जात नाही. उलट पाणिनीनं या विषयावर २५० सूत्रं लिहिली आहेत.) याचा अर्थ असा की शब्द, म्हणजे ध्वनिसमूह, सार्थ आहे एवढी गोष्ट व्याकरणाला आपलं काम करायला मूलतः पुरेशी आहे. म्हणूनच, 'माणसाला चार पाय असतात' असलं वास्तवाला सोडून असलेलं वाक्य व्याकरणाला चालतं, कारण ते वाक्यरचनेच्या नियमांना धरून आहे. संस्कृतात यासारखं दिलं जाणारं उदाहरण 'भट्टस्य कट्यां सरटः प्रविष्टः' (गुरुजींच्या कमरेत सरडा शिरला) हे आहे. हे वाक्य व्याकरणाच्या नियमांनुसार शंभर टक्के बरोबर आहे.

**आनुषंगिक विशेष**

प्रत्यक्ष बोलण्यात भर/जोर (stress), आवाजाचा चढउतार अशा कारणांनी वाक्याच्या अर्थात जो सूक्ष्म फरक पडतो त्याच्याशी व्याकरणाला काही कर्तव्य असत नाही. अभिजात संगीतात ज्या चिजा असतात त्यांतल्या शब्दांच्या उच्चारांशी गवयाला काही कर्तव्य नसतं. हे उच्चार प्रमाण भाषेतल्या उच्चारांना अनुरूप असतील किंवा नसतील. वेदपरंपरेत सामगान करतात त्यात मूळ आधारभूत ऋचा ऋग्वेदातल्या असतात; पण सामाच्या संगीतरचनेत मूळ शब्दांचे उच्चार पार विसकटून जातात. हा दोष गणला जात नाही, कारण संगीतात प्राधान्य संगीतस्वरांच्या मांडणीला असतं, मूळ शब्दवाक्यरचनेला नसतं. उलट भावगीतगायनात, गाणारी व्यक्ती शब्दांच्या उच्चारांची अधिक काळजी घेते, कारण अशा गायनात संगीत हे अर्थाची खुलावट करण्यासाठी असतं. ही उदाहरणं, व्याकरणात प्रकृत्यर्थाला स्थान नसतं किंवा फार





अनुक्रमणिका

मर्यादित असतं या घटनेचा उलगडा करू शकतील. नेमून घेतलेल्या विषयमर्यादेचं उल्लंघन करीत असेल तर शास्त्र हे शास्त्रच नव्हे; कारण असं उल्लंघन तर्कशास्त्राच्या शिस्तीला सोडून आहे, आणि जे मूलभूत शिस्त पाळत नाही ते शास्त्र कसलं ? शास्त्रांच्या प्रगतीचं मूळ त्यांच्या तर्कनिष्ठेत आहे.

**अध्यापन**

अध्यापनाचं क्षेत्र याहून वेगळं आहे. या क्षेत्रात एखादा विषय शिकवला जातो तो टप्प्याटप्प्यानं. एखाद्या इमारतीप्रमाणं ही प्रक्रिया पायापासून (स्थूल ज्ञान) सुरू होऊन शिखरापर्यंत (सूक्ष्म ज्ञान) पोचते. विषय शिकवताना कुशल शिक्षक बाहेरचे दाखले देतो ते विद्यार्थ्यांना विषयाचं आकलन सुखाचं व्हावं यासाठी; कारण शिक्षण म्हणजे ज्ञाताकडून अज्ञाताकडं प्रवास असतो, आणि विषय कळण्यासाठी आणि मनात रुजण्यासाठी ज्या साधनांचा उपयोग होण्यासारखा असेल ती सर्व साधनं शिक्षणात वापरता येतात. एखादी कविता शिकवताना शिक्षक ती गाऊनही दाखवू शकेल. हा आनुषंगिक भाग आहे. असे उपाय कल्पक शिक्षक व्याकरण शिकवतानाही उपयोगात आणू शकेल. म्हणून काही ते व्याकरणाचा भाग होऊ शकत नाहीत. नियुक्त विषयातला किती भाग शिकवायचा हे लक्ष्यभूत विद्यार्थी शिक्षणाच्या कोणत्या टप्प्यावर आहेत यावर अवलंबून असतं. गणित-शिक्षणाची सुरवात साध्या बेरजेपासून होते. विद्यार्थी जसजशी प्रगती करील तसतशी विषयाची प्रगत अंगं (बीजगणित, भूमिती...) त्या विषयाच्या शिक्षणात येत जातात. ही व्यवस्था व्याकरणाच्याही शिक्षणात गृहीत आहे.

**उपसंहार**

थोडक्यात, अध्यापन हे तंत्र आहे. आणि तंत्र ही सोय आहे. शास्त्रात सोय, गैरसोय हा विचार अप्रस्तुत आहे. शास्त्रानं आखून घेतलेल्या चतु:सीमांत जे येतं ते तर्कशुद्ध पद्धतीनं मांडलं की शास्त्राचं काम झालं. व्यवहार्य, अव्यवहार्य हा विचार शास्त्राच्या कक्षेत येत नाही. शास्त्रविचारात या वास्तवाचं भान सुटलं की शास्त्र संपलं.

## परिशिष्ट : प्रा. कामत यांचे विचार

मराठीची रूढ व्याकरणव्यवस्था प्रा. कामत मान्य करीत नाहीत. ही व्यवस्था रूपप्रधान, रूपकेंद्रित आहे. त्यांच्या मते ती अर्थप्रधान, अर्थकेंद्रित असायला हवी, लवचीक हवी, परिवर्तनशील हवी. संगणकयुगात तर ही गरज अधिकच आहे. विभक्तिप्रत्ययांचे परंपरागत गट (स, ला, तें...) अर्थनिष्ठच आहेत. द्वितीया आणि

चतुर्थी यांचे प्रत्यय समान असतात (स, ला, तें...); अशा परिस्थितीत निर्णय अर्थावरूनच होतो. 'डोंगर' हे रूप ए.व. की अ.व. याचा निर्णय अर्थावरून (हिरवा दिसतो/हिरवे दिसतात) होतो. 'व्याकरणात रूप हे प्रधान तत्त्व, अर्थ हे दुय्यम' ही अर्जुनवाडकरांच्या व्याकरणविषयक ग्रंथात ('मराठी व्याकरण : वाद आणि प्रवाद') मांडलेली व्याकरणव्यवस्था कामत अमान्य करतात. विभक्तिव्यवस्था (प्रथमा...) आणि कालार्थव्यवस्था (ताख्यात, लाख्यात...) ही परंपरागत प्रत्ययनिष्ठ मांडणी योग्य नाही; ती वस्तुनिष्ठ म्हणजे अर्थनिष्ठ (क्रियेची स्थिती, अर्थोद्देश..., इतर भाषांचा मराठीवर परिणाम...) असायला हवी. ती तशी नसल्यामुळं बराच भाषाव्यवहार व्याकरणाबाहेरच राहतो.

अर्थव्यवस्था हा व्याकरणाचा आधार ठरला की अभिधा, लक्षणा, व्यंजना हे अर्थस्तर व्याकरणाच्या व्यवस्थेत येतात. व्याकरणाची सगळी मांडणीच नव्यानं करणं अपरिहार्य आहे.

**प्रा. कामत यांचे विचार : एक चिकित्सा**

कामत शिफारस करतात तशी व्याकरणाची अर्थनिष्ठ मांडणी एक प्रयोग म्हणून त्यांनी तपशीलवार करून दाखवावी; म्हणजे परंपरागत मांडणी आणि ही नवी मांडणी यांची तुलना करता येईल, आणि दोन व्यवस्थांचा गौरव-लाघवांच्या आणि एकूण तर्कसंगतीच्या दृष्टीनं विचार करणं शक्य होईल. जे तर्काशी फटकून राहतं, त्याला शास्त्र कसं म्हणावं ? शास्त्राचा विषय जड सृष्टी असो वा मानवी व्यवहार असो, जातिसंकल्पना हा तिचा आरंभ आणि आधार असतो, आणि सामान्याकडून विशेषाकडं हा तिचा प्रवासमार्ग असतो. जाति म्हणजे व्यापक समूहावर राहणारा धर्म. एखाद्या शास्त्रात विषयाचे मूलभूत वर्ग केले जातात ते याच आधारावर. रसायनशास्त्र मूलद्रव्यांची (H, O, S,...) निश्चिती होते ती वर्गीकरण याच तत्त्वाच्या आधारानं. या मूलद्रव्यांचे संयोग ($H_2O$, $H_2So_4$ etc,...) हा पुढच्या विवेचनाच विषय. अगदी अपवादात्मक प्रसंगी मूलद्रव्यांत नव्या संशोधनानं भर पडते. मादाम क्यूरीनं शोधून काढलेल्या रेडियम या मूलद्रव्याचा इतिहास याला साक्ष आहे. शास्त्रं जशी प्रगत होत जातात, तसतशी अभ्यासविषयांची क्षेत्रं मुख्य विषयांच्या विविध अंगांपैकी एकेकावर केंद्रित होतात. जसजसं ज्ञान विकसित होतं तसतसं तज्ज्ञतेचं, सखोल अभ्यासाचं क्षेत्र लहान होत जातं. इतिहासकालात 'सायन्स' म्हणून जो विषय होता, त्याच्या विविध शाखा (फिजिक्स, केमिस्ट्री, बायॉलॉजी...) पुढच्या कालात विकसित झाल्या. जीवसृष्टिविषयक शास्त्रांचा असाच इतिहास आहे. वैद्यकाच्या क्षेत्रात तर भिन्न भिन्न शरीरावयवांचे किंवा त्यांच्या कार्यांचे व्याधी आणि त्यावर उपचार करणारे तज्ज्ञ

आजकाल निर्माण झाले आहेत. एकूण शास्त्रीय अभ्यासाच्या प्रवासाची दिशा सामान्याकडून विशेषाकडे अशी असल्याचा इतिहासाचा निर्वाळा आहे. संगणकयुग अस्तित्वात आल्यानं या व्यवस्थेत आणि अभ्यासपद्धतीत काही फरक पडला आहे. असं आढळत नाही. फरक पडलाच असेल तर तो ज्ञानसंपादनाच्या सुकरतेत पडला आहे. शास्त्राचा मूलाधार प्रमाण हा आहे, साधनसामग्री हा नाही. मुद्रणव्यवस्था अस्तित्वात आल्यानं शास्त्रकल्पनांत फरक पडला असा अनुभव नाही.

हा अन्य शास्त्रांचा इतिहास भाषाविषयक शास्त्रांनाही उपपन्न आहे. वर्णनात्मक, ऐतिहासिक आणि तुलनात्मक (डिस्क्रिप्टिव्ह, हिस्टॉरिकल, कंपॅरटिव्ह) अशा भाषाभ्यासाच्या तीन दिशा किंवा शाखा प्रस्थापित अध्ययनक्षेत्रात मान्यता पावल्या आहेत. यापैकी कोणत्याही एका प्रकारात दुसऱ्या प्रकाराची भेसळ शास्त्र मान्य करीत नाही. इतिहासाचार्य राजवाडे यांनी मराठी व्याकरणावर जे लेखन केलं आहे त्यात अध्ययनशाखांची भेसळ आहे; त्यामुळं त्यांचं हे लेखन शास्त्राच्या कसोटीला उतरत नाही, हे मी अन्यत्र दाखवून दिलं आहे. (पाहा : भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे या संस्थेचं त्रैमासिक; खंड ८१-८२, जुलै २००४ - एप्रिल २००६; पृ. ३५-५१) भारतातली शास्त्रपरंपरा माझ्या या भूमिकेला पोषक आहे. प्रत्येक शास्त्राची गृहीतं आणि कार्यकक्षा भिन्न आणि त्या त्या शास्त्रापुरत्या मर्यादित असल्यामुळं एका शास्त्राला जे ग्राह्य ते दुसऱ्या शास्त्राला ग्राह्य असेलच असं नाही. या ग्राह्याग्राह्य भूमिकेची थट्टा करणारं एक नैयायिकांचं म्हणून उद्धृत केलं जाणारं वचन संस्कृत परंपरेत प्रचारात आहे : 'अस्माकूणां नैयायिकाणाम् अर्थरि तात्पर्यं न तु शब्दरि' (आम्हां नैयायिकांचा रोख अर्थावर असतो, शब्दावर नाही). या विधानात बहुतेक रूपं व्याकरणदुष्ट आहेत; त्यावरून न्यायपांडितांचा रोख व्याकरणावर नसून प्रतिपाद्यावर असतो हे स्पष्ट होतं. याच्या उलट न्यायपंडिताला अग्राह्य असलेलं पण वैयाकरणाच्या दृष्टीनं निर्दोष आणि ग्राह्य ठरणारं विधान (भट्टस्य कट्यां...) वर मूळ निबंधात उद्धृत केलं आहे. ऑपरेशनसाठी टेबलावर घेतलेला रुग्ण सदाचारी आहे की दुराचारी, याचा विचार डॉक्टर करीत नाही; त्यानं असा विचार करू नये असं त्या व्यवसायातली आचारसंहिता सांगते. संस्कृत शास्त्रपरंपरेतली शुद्ध शास्त्रदृष्टी मराठीला मानवत नसेल तर त्याचा अर्थ असा होतो की मराठीतला शास्त्रविचार अजून बाल्यावस्थेत आहे.

या निष्कर्षाला पोषक असा पुरावा या चर्चेचा उगम ज्यात आहे त्या प्रा. कामत यांच्या लेखातच मिळतो. या लेखात शेवटी तीन शब्दशक्तींचा निर्देश केला आहे : अभिधा, लक्षणा, व्यंजना. या शक्तींच्या द्वारा जे अर्थप्रकार प्रतीत होतात ते आहेत, अनुक्रमे -- वाच्य, लक्ष्य, व्यंग्य. हे त्रिविध अर्थ आणि त्यांची प्रतीती करून देणाऱ्या

तीन शब्दशक्ती या संकल्पना काव्यशास्त्राच्या कक्षेतल्या आहेत. त्यापैकी केवळ अभिधा ही शक्ती आणि वाच्य हा अर्थ यांचाच संबंध व्याकरणात येतो. व्याकरणाची मांडणी अर्थदृष्टीवर भर देऊन केली पाहिजे असं कामत वारंवार सांगतात, आणि या भूमिकेला अनुरूप अशी उदाहरणं देतात. हे पाहिल्यावर त्यांच्या अर्थसंकल्पनेत काव्यशास्त्रातले तिन्ही प्रकारचे अर्थ येतात हे स्पष्ट होतं. दोन माणसांच्या वादात येऊ शकेल असे 'तुम्ही फार शहाणे आहात !' हे वाक्य लक्षणामूलक (विपरीत लक्षणा) आणि अगदी विरुद्ध अर्थाचं ठरतं. परिणामत:, 'शहाणे' या शब्दाचा अर्थ 'मूर्ख' असा ठरतो. कामत देतात ते 'हात मारणे' यासारखे वाक्प्रचार लक्षणेच्याच कक्षेत येतात. अर्थदृष्टीवर आधारलेली व्याकरणाची मांडणी करण्याचा आग्रह धरणारे कामत अशा विधानांची काय व्यवस्था करणार आहेत ? लक्षणेतून व्यंजनेत शिरल्यावर तर आपत्ती आणखी वाढेल; कारण वाच्यार्थ एकच असलेल्या एकाच विधानातून संदर्भानुसार अनेक व्यंग्यार्थ, परस्परांशी असंबद्ध असेही, निघू शकतात. (याची उदाहरणे मम्मटाच्या काव्यप्रकाशात दुसऱ्या उल्लासात पाहावी.) वाक्यात श्लेष अलंकार असेल तर एकाच शब्दातून / वाक्यरचनेतून अनेक अर्थ निघतात. अर्थदृष्टीवर आधारलेल्या व्याकरणाची रचना केली पाहिजे असा आग्रह धरताना आपण व्याकरण आणि काव्यशास्त्र या दोहोंचं एक संयुक्त शास्त्र करण्याची योजना मांडीत आहो याचं भान प्रा. कामत यांना नसावं. आजपर्यंतचा शास्त्रांचा विकास पाहिला तर असं दिसून येतं की एका शास्त्राची गृहीतं दुसऱ्या शास्त्राला बंधनकारक नाहीत. किंबहुना असा संकर होणार नाही याची काळजी त्या त्या शास्त्राच्या पंडितांनी घेतली, म्हणूनच आजवर शास्त्रांचा प्रवास निर्वेध होत आला.

अर्थाच्या आधारानं व्याकरणरचना ही भूमिका स्वीकारल्यावर आणखी आपत्ती येतात. प्रत्यय एक, अर्थ अनेक, - अशी भूमिका प्रस्थापित व्याकरण संकल्पनेत आहे. व्याकरणाची मांडणी अर्थाश्रित असावी या भूमिकेनुसार व्याकरणाचा नकाशा कसा असणार आहे ? संस्कृतात षष्ठी विभक्तीचे अर्थ १०० असल्याचा प्रवाद आहे, – 'एकशतं हि षष्ठ्यर्थाः'. मराठीतही षष्ठी विभक्तीतून अनेक अर्थ निघतात : 'पुस्तकाचं वाचन' (कर्म), 'मातीचा घडा' (उपादानकारण); 'स्फोटाची बातमी' (विषय): 'राजा रविवर्म्याचं चित्र' (कर्ता); 'पर्वताचं छायाचित्र' (विषय); 'माझं घर' (मालकी); 'गावाची पाहणी' (कर्म); 'झाडाची सावली' (उगम); -- अशी किती तरी उदाहरणं, शोधल्यावर सापडतील. प्रत्ययाश्रित व्याकरण-मांडणीत अशी यादी वाढवायला वाटेल तेवढा अवसर आहे; अशी अर्थांची यादी वाढल्यानं व्याकरणाच्या मूलभूत मांडणीत फरक पडत नाही. अर्थाश्रित व्याकरणाच्या योजनेत





अनुक्रमणिका

अशा याद्यांवर आधारलेला व्याकरणाचा नकाशा कसा असणार आहे? यात आणखी एक अडचण अशी आहे की अशा अर्थांच्या याद्या पूर्ण झाल्या अशी खातरी कोणालाच देता येत नाही. प्रत्ययाश्रित व्याकरण मांडणीत ही अडचण नाही; कारण अर्थांच्या तुलनेत विभक्तींच्या आणि कालार्थांच्या प्रत्ययांची संख्या मर्यादित असते. प्रत्यय हा विभक्तिव्यवस्थेचा आधार, या भूमिकेशी सुसंवाद राखूनच मी मराठीत विभक्तिसंख्या (५) सांगितली आहे. ('वाद आणि प्रवाद', पृ. १४८) कृत् (उदा० विणकर) आणि तद्धित (उदा० टोपीवाला) प्रत्ययांची संख्या या मानानं अधिक असली तरी त्यांच्या उदाहरणांच्या तुलनेत ती मर्यादितच असते. कामत शिफारस करतात त्या व्याकरण-मांडणीत समासांची व्यवस्था काय असणार आहे हे एक गूढच आहे. 'असा विषय इंग्रजी व्याकरणात नसतो, तर मराठी व्याकरणात कशाला ?' अशी भूमिका घेतली तर त्याची स्वतंत्र चर्चा करावी लागेल. भाषांची घडण-स्वरूप आणि त्यांचं व्याकरण यांचा जवळचा संबंध असतो. एका व्याकरणाशी तंतोतंत सारखं दुसरं व्याकरण असत नाही. विशिष्ट भाषेचा विकास कसा झाला, त्या भाषेची ठेवण कशी आहे याच्याशी व्याकरणाचा जवळचा संबंध आहे.

'व्याकरण हे लवचीक आणि परिवर्तनशील हवे' या विधानाचा अर्थ काय? भाषा बदलेल तसं व्याकरणही बदललं पाहिजे असा अर्थ असेल तर त्यात आक्षेपार्ह काही नाही. आजच्या काळात मराठीचं व्याकरण म्हणून ज्ञानेश्वरीच्या मराठीचं व्याकरण शिकवण्यात काय अर्थ आहे? व्याकरणानं दखल घेण्यासारखे बदल आजच्या प्रमाण मराठीत आढळत असतील तर त्यांची नोंद व्याकरणानं केली पाहिजे. भौतिक शास्त्रांत अपवादात्मक परिस्थितीत असे बदल होतात हे रेडियम या धातूच्या संशोधनाच्या इतिहासात दिसतं. पण या मुद्द्यावर प्रमाण मराठी आणि तिच्या बोली यांचा काला करणं शास्त्रशुद्ध नव्हे. प्रमाण भाषा आणि बोली असा विभाग सर्वच प्रस्थापित भाषांच्या विवेचनात केला जातो. आजच्या प्रमाण मराठी बोलण्यात अधूनमधून इंग्रजी शब्द येतात म्हणून त्यांची दखल मराठीच्या व्याकरणानं घ्यावी काय? ही उधार-उसनवारी आहे, आणि ही घटना सर्वच भाषांत आढळणारी आहे. पण अखेर हा भाग शब्दसंग्रहाशी (व्होकॅब्युलरीशी) संबद्ध आहे; व्याकरणाशी नाही. शब्दसंग्रहात भर म्हणजे व्याकरणात बदल नव्हे.

प्रा. कामत यांच्या भूमिकेला पोषक अशी एक घटना वर्तमान मराठीत आहे : प्रमाण भाषेच्या उच्चारणात नसलेला एक प्राचीन मराठीचा विशेष आजच्या प्रमाण लेखनात आहे. प्रमाणभूत बोलण्यात जी रूपं (नपुं. ए.व., उदा० 'मोठं पुस्तक') दीर्घ-अकारान्त असतात, ती प्रमाणभूत प्रौढ लेखनात एकारान्त असतात ('मोठे

पुस्तक'). (नाटकातल्या संवादात 'मोठं पुस्तक' चालतं.) ही विसंगती मला मान्य नाही. 'मराठी व्याकरणाचा इतिहास' या माझ्या प्रकाशित ग्रंथात मी सर्वत्र 'मोठं पुस्तक' यासारखा उच्चारानुसारी रूपांचा उपयोग केला आहे. हे लेखन म.सा.प. च्या प्रस्थापित शुद्धलेखन-नियमावलीत बसणारं नाही. प्रा. कामत यांच्या मतांना काहीशी अनुकूल अशी ही घटना आहे. स्वत: कामत आपलं भाषाविषयक मत बाजूला ठेवून प्रचलित नियमानुसार लेखन करतात; त्याचं काहीसं समर्थन अवश्य करता येईल. पण त्यांच्या भाषा-व्याकरणविषयक मतांशी प्राय: असहमत असलेल्या लेखकाचा व्याकरणावरचाच निर्दिष्ट प्रौढ ग्रंथ त्यांच्या भूमिकेशी सुसंवाद राखणारा आहे हे लक्षणीय आहे.

■

२, देवांगिनी, ११९२, शुक्रवार पेठ, पुणे 411 002. दूरध्वनी : 24479419










# व्याकरण आणि अर्थ : आधुनिक भाषावैज्ञानिक दृष्टिकोण

मिलिंद मालशे

एक

या लेखामध्ये आपल्याला भाषेचे व्याकरण आणि भाषिक घटकांचा अर्थ यांच्या संबंधांचा विचार करायचा आहे. हा विचार करताना काही मूलभूत आणि व्यापक प्रश्नांचा संदर्भ मनात ठेवणे आवश्यक आहे. आपण प्रथम भाषा म्हणजे काय? भाषेचे व्याकरण म्हणजे काय? भाषेचा वैज्ञानिक अभ्यास म्हणजे काय ? या मूलभूत प्रश्नांच्या संदर्भात थोडेसे विवेचन करू, आणि नंतर काही व्याकरणिक बाबींचा विचार करू.[१]

भाषेला मानवाच्या सामाजिक जीवनामध्ये मूलभूत स्थान असते. जीवनाच्या विविध पैलूंचा आविष्कार भाषा करीत असते, असे म्हणता येईल. मानवाला आपल्या जीवनाच्या विविध पैलूंविषयी संदेशनव्यवहार करता यावा, यासाठी एक माध्यम म्हणून भाषा वावरते, आणि त्यानुसारच तिचे स्वरूप निश्चित झालेले असते, असा एक विचार काही अभ्यासक मांडतात. भाषेचे सामाजिक स्वरूप हेच मूलभूत मानून भाषेचे स्वरूप त्यावर अवलंबून असते असे मानणारा हा विचार आहे.[२] मात्र वैज्ञानिक दृष्टीने विचार करता दोन तत्त्वे ध्यानात घेणे आवश्यक ठरते. एक म्हणजे, भाषा ही एक चिन्हव्यवस्था असते. तिचे स्वरूप हे मूलतः रचनात्मक, रचनाधिष्ठित असते. दुसरे म्हणजे, भाषेचे हे रचनाधिष्ठित स्वरूप जैविक पातळीवर निर्धारित झालेले असते, म्हणजेच मानवापाशी जैविक पातळीवर निर्धारित झालेली भाषाशक्ती असते. सामाजिक व्यवहार जो चालतो तो या जैविकतेच्या आणि रचनाधिष्ठिततेच्या मर्यादांमध्ये चालतो. म्हणजेच भाषेच्या सामाजिक, संदेशनात्मक कार्याचा परिणाम म्हणून भाषिक रचना निर्माण होतात असे नसून, भाषिक रचनेच्या मर्यादेमध्ये सामाजिक, संदेशनात्मक कार्ये घडतात, असे म्हणायला हवे. या भूमिकेची मांडणी काही पुरावे आणि युक्तिवाद देऊन पुढील छेदकांमध्ये आपण करू.

दोन

आपण एक उदाहरण घेऊ. मानवाच्या शारीरिक वाढीचा संबंध अन्नाशी असतो,

यात शंकाच नाही. परंतु विशिष्ट अन्नामुळे माणसाच्या शरीराची रचना ठरते, असे आपण म्हणू का ? उदाहरणार्थ, आपण पक्ष्यांचे अन्न (दाणे, फळे इ०) खाल्ले की आपल्याला हातांऐवजी पक्ष्यांसारखे पंख फुटतील का ? त्याचप्रमाणे पक्ष्यांनी मानवासारखे शिजवलेले अन्न खाल्ले तर त्यांना पंखांऐवजी हात फुटतील का ? हे का शक्य नाही ? मानवाच्या किंवा कोणत्याही सजीवाच्या शरीराची रचना ही जैविक दृष्ट्या निसर्गतःच निर्धारित झालेली असते. शरीराला विशिष्ट सामाजिक कार्ये करायला लावून वा विशिष्ट प्रकारचे अन्न खाऊन त्या रचनेत बदल करता येत नाही; तसे बदल करायचे झाले तर जैविक पातळीवर करावे लागतील.

आणखी एक उदाहरण घेऊ. मानवाला जग पाहण्याची दृष्टी दोन डोळ्यांच्या द्वारे निसर्गतःच प्राप्त झालेली असते. समाज, संस्कृती, सामाजिक कार्ये इत्यादींचा या जैविक द्विनेत्री दृष्टीने घालून दिलेल्या मर्यादांमध्येच चालू असते. (त्रिनेत्री दृष्टी ही मानवाच्या बाबतीत एक मिथकच म्हटले पाहिजे !) तीच गोष्ट द्विकर्णी श्रवणशक्तीची आहे. तेव्हा माणसाच्या शरीराची रचना, त्या शरीराच्या विविध भागांचे परस्परांशी संबंध इत्यादी गोष्टी जैविक पातळीवर निर्धारित झालेल्या असतात. विशिष्ट सामाजिक वा सांस्कृतिक कार्यासाठी मानवाला आपले शरीर वापरायचे असल्याने मानव शरीराची रचना विशिष्ट प्रकारची झालेली असते, असा दावा आजवर तरी कोणा जीववैज्ञानिकाने केलेला नाही. उजवेपणा-डावखुरेपणा यांच्यावर झालेल्या संशोधनावरूनही असे दिसते की मानवी शरीराच्या अवयवांची जैविक संरचना व कार्ये ही सामाज़िक व सांस्कृतिक कार्यांवर अवलंबून नसतात.

शारीरिक वाढ, दृष्टी, श्रवणशक्ती इत्यादींबद्दल आपण जे मुद्दे मांडले ते भाषाशक्तीलाही लागू पडतात का? असा प्रश्न येथे साहजिकपणे उभा राहतो. येथे भाषिक व्यंगासंबंधीचे काही वैज्ञानिक पुरावे ध्यानात घेता येतील. मानसोपचारतज्ज्ञांना काही लहान मुलांच्या बाबतीत पुढील प्रकारचे एक व्यंग आढळले आहे. ही मुले इतर सर्व बाबतीत अव्यंग, इतर मुलांसारखीच असतात; शारीरिक, मानसिक वा बौद्धिक दृष्ट्या त्यांना इतर काही आजार वा व्याधी नसते. ही मुले मुकी वा कर्णबधिर नसतात. त्यांच्या मेंदूच्या कोणत्याही भागाला इजा झालेली नसते. भाषेच्या बाबतीत मात्र ही मुले व्याधिग्रस्त असतात. त्यांची इतर शारीरिक व बौद्धिक वाढ नॉर्मल असते, परंतु भाषिक वाढ खूप उशिरा सुरू होते. ही वाढ अत्यंत सावकाश होते. त्यांचे बोलणे अतिशय संथ असते आणि त्यात सहजपणा अजिबात नसतो तर ते फार प्रयत्नपूर्वक केलेले असते आणि या मुलांना प्रौढ झाल्यांनतरही मातृभाषेत व्याकरणदृष्ट्या सुरचित अशी रूपे वापरताच येत नाहीत. किंबहुना सुरचित आणि

कुरचित रूपे यांतला फरकच त्यांना दाखवून दिल्यावरसुद्धा समजत नाही. या व्यक्ती एखाद्या प्रमाणेतर बोलीमधील रूपे किंवा रचना वापरतात असे नव्हे. त्यांच्या भाषिक प्रयोगांत कोणत्याच प्रकारची सातत्यपूर्ण रचना आढळत नाही. नामांची एकवचनी व अनेकवचनी रूपे यांतील फरक त्यांना जाणवलेला नसतो, किंवा क्रियापदांच्या काळरूपांची त्यांना अजिबात जाण नसते. अशा व्यक्ती समाजात संदेशन करण्याइतपत भाषा शिकतात, परंतु त्यांची भाषिक जाण कोणत्याही प्रकारचे शिक्षण त्यांना दिले तरी सुधारू शकत नाही. हे एक प्रकारचे भाषिक व्यंगच असते आणि ते आनुवंशिक स्वरूपाचे असलेलेही आढळले आहे. याला 'स्पेसिफिक लॉंग्विज इंपेअरमंट' किंवा 'एस्.एल्.आय.' असे नाव आहे. या 'भाषाविशिष्ट' जैविक व्यंगा'वर अजून तरी कोणताही उपाय सापडलेला नाही.

याच्या नेमका उलट प्रकारही घडताना आढळतो. क्रोमोझोम क्रमांक ११मध्ये व्यंग निर्माण झाल्यामुळे काही मुलांच्या शरीरामध्ये कॅल्शियमची तीव्र कमतरता निर्माण होऊन 'विल्यम्झ् सिन्ड्रोम' नावाचे एक शारीरिक व मानसिक व्यंग निर्माण होते. यामुळे शरीराची वाढच जवळ जवळ थांबते आणि शरीर अगदी किरकोळ असलेले आढळते. बुटाचे बंद बांधण्यासाठी लागणारे शारीरिक अवयवांचे नियंत्रण त्यांच्यापाशी नसते. त्यांची मानसिक वाढही अगदी क्षीण असते, अंकमोजणीची क्षमता त्यांच्यापाशी जवळ जवळ नसतेच आणि स्थलपरिमाणाचे त्यांचे भानही फार क्षीण असते. मात्र अत्यंत आश्चर्याची गोष्ट म्हणजे त्यांची भाषिक वाढ ही अव्यंग मुलांसारखीच असते. ही मुले बडबडी असतात आणि अत्यंत उत्साहाने बोलत राहतात. व्याकरणिक नियमांची त्यांची जाण अत्यंत प्रगल्भ असलेली आढळते. विभक्ती, वचन, काळ यांची रूपे, त्याचप्रमाणे गुंतागुंतीच्या वाक्यरचना यांवर त्यांचे प्रभुत्व असते. ही मुले अतिशय सहजपणे गोष्टी रचू शकतात व सांगू शकतात. बऱ्याचदा त्यांचे वास्तवाचे भान क्षीण झालेले असते, परंतु गोष्ट सांगताना त्यांचे भाषिक भान अत्यंत तीव्र असते. याचा अर्थ असा की शारीरिक आणि मानसिक व ज्ञानात्मक क्षमतांना खूप इजा पोहोचूनसुद्धा भाषिक क्षमता येथे अबाधित राहिलेली असते.

तेव्हा या दोन्ही उदाहरणांवरून असे दिसते की मानवाच्या मूलभूत भाषाशक्तीचा संबंध सामाजिक-सांस्कृतिक परिसराशी, किंवा शारीरिक-बौद्धिक वाढीशी नसून जनुकांशी असतो. यातून लगेच भाषाशक्तीचे एक स्वतंत्र जनुक असते, असा निष्कर्ष काढणे योग्य ठरणार नाही. मात्र भाषाशक्ती ही एक खूपशी स्वायत्त जैविक शक्ती असते, असा भरपूर पुरावा अभ्यासकांकडे आज उपलब्ध आहे.

भाषेला सामाजिक व सांस्कृतिक कार्ये नसतात, असे येथे निश्चितच म्हणायचे





अनुक्रमणिका

नाही. परंतु या कार्यांचे अधिष्ठान हे रचनात्मकतेमध्ये असते व भाषेची रचना ही मूलभूत अशा जैविक पातळीवर निर्धारित झालेली असते, हे विसरून चालणार नाही. भाषेविषयीची ही भूमिका नोम चॉम्स्की यांनी विकसित केलेली आहे (पाहा: Chomsky 2000; मराठी भाषांतर; मालशे २००५). मानवी ज्ञानशक्तींचे संशोधन करणाऱ्या 'कॉग्निटिव्ह् सायन्स' या अभ्यासक्षेत्रातील संशोधनामधून या भूमिकेला पोषक असे पुरावेही हाती लागत आहेत.

वैज्ञानिक संशोधनामध्ये एक सैद्धांतिक पातळी असते. भाषेविषयी एक वर्तनवादी भूमिका १९३० ते १९५५ या कालखंडामध्ये मान्यता पावलेली होती. या भूमिकेवर मूलभूत स्वरूपाचे आक्षेप घेताना चॉम्स्की यांनी असा युक्तिवाद केला आहे की वर्तनवादी भूमिकेमध्ये मानवाच्या मनाविषयी, ज्ञानशक्तींविषयी, त्याचप्रमाणे भाषेविषयी पुरेसा व्यापक स्वरूपाचा सिद्धांत नव्हता. केवळ वर्तनाच्या तुकड्यातुकड्यांचे विश्लेषण चेतक-प्रतिसाद यांच्या साहाय्याने करून मानवी मनाची किंवा भाषेची संकल्पना हाती लागणार नाही; मानवी मनाच्या ज्ञानात्मक शक्तींविषयीचा एक समग्र सिद्धांत मांडल्याशिवाय वर्तनाच्या विश्लेषणाला फ़ारसा अर्थ राहाणार नाही. या प्रकारचा ज्ञानात्मक सिद्धांत चॉम्स्की यांनी स्वत: मांडला व त्याच्या संदर्भात भाषाशक्तीच्या संकल्पनेची चर्चा त्यांनी केली. या नव्या भूमिकेतूनच मनोविज्ञान आणि भाषाविज्ञान या क्षेत्रांमध्ये क्रांती घडून आलेली आहे.

मात्र त्याचबरोबर पृथक्करणात्मक पद्धती हीच विज्ञानाची मूलभूत पद्धती म्हणायला हवी. समग्र सिद्धांताच्या मागे लागून आपण जर विज्ञानाच्या मर्यादांचे भान ठेवले नाही तर वैज्ञानिक प्रगतीऐवजी आध्यात्मिक भोंगळपणा आपल्या पदरी पडेल. मानवी ज्ञान, मन, भाषा, समाज, संस्कृती इत्यादींविषयीचे जे सिद्धांत मांडले जातील ते विज्ञानाला विश्लेषणात्मक पद्धतीने पडताळून पाहता येतील असेच असले पाहिजेत. समग्र विश्वाविषयीचा सनातन सिद्धांत मांडणे हे विज्ञानाचे स्वरूप वा कार्य असू शकत नाही. हळू हळू, तुकड्या-तुकड्यांनी विश्लेषण करीत ज्ञान जमवीत जाणे, याला पर्यायी पद्धती विज्ञानपाशी नाही.[३]

## तीन

भाषेतील शब्दरूपे, वाक्यरचना आणि त्यांचे अर्थ यांपैकी अर्थ हा मूलभूत मानणाऱ्या भूमिकेला एक परंपराही आहे. परंतु ही भूमिका शास्त्रीय दृष्टीने विचार करता टिकणारी नाही. भाषेचा गाभ्याचा किंवा मूलभूत गुणधर्म म्हणजे रचनाधिष्ठितता आहे, आणि हा गुणधर्म ध्वनी, शब्द, वाक्य व अर्थ या सर्व पातळ्यांवर आढळतो, हे आधुनिक भाषावैज्ञानिकांनी सिद्ध करून दाखविलेले आहे. अर्थ हासुद्धा भाषेत








रचनेच्या पातळीवर वावरतो, आशयाच्या पातळीवर नव्हे, हे भाषाविज्ञानातील एक सर्वमान्य तत्त्व आहे.[४] अर्थाचे विश्लेषणही लघुत्तम अर्थघटकांच्या साहाय्याने करण्याची कल्पना त्यातूनच उदयाला आलेली आहे. उदाहरणार्थ, 'पुरुष' आणि 'मुलगा' या शब्दांमध्ये (+सजीव), (+मानवी) आणि (+पुरुषत्व) हे अर्थघटक समान आहेत, परंतु 'पुरुष' या शब्दाच्या अर्थामध्ये (+ प्रौढ) तर 'मुलगा' या शब्दाच्या अर्थामध्ये (-प्रौढ) असे अर्थघटक असल्याने त्यांच्या अर्थामध्ये भेद निर्माण झालेला आहे, असे दाखविता येते.

'भाषेचे व्याकरण' या संकल्पनेचे भाषा वैज्ञानिक स्पष्टीकरण येथे द्यायला हवे. पारंपरिक दृष्ट्या शब्दांची रूपे आणि वाक्यरचना यांच्या घडणीच्या नियमांचा अभ्यास म्हणजे व्याकरण, असा अर्थ रूढ आहे. परंतु व्यापक दृष्टीने पाहता मानवी भाषेची घडण किंवा संरचना ही ध्वनी, शब्द, वाक्य आणि अर्थ या चारही पातळ्यांवर नियमबद्ध स्वरूपाची असते. संरचनेच्या या सर्व पातळ्यांवरील विश्लेषणाला आधुनिक भाषाविज्ञानामध्ये 'भाषेचे व्याकरण' असे म्हटले जाते. आपण याच अर्थाने ही संकल्पना वापरू.

ध्वनींच्या पातळीवर भाषा ही एक रूपाधिष्ठित वा आकारिक स्वरूपाची व्यवस्था असते, हे सहजच दाखवून देता येईल. मानवी भाषेमध्ये मूलध्वनी किंवा स्वनिम असतात व त्यांची रचना होऊन संरचनेच्या अधिक व्यामिश्र पायऱ्या निर्माण होत असतात. 'वर्ण' या संकल्पनेचा संबंध मुळात उच्चारांशी किंवा स्वनिमांशी असला तरी मराठी व्याकरणाच्या परंपरेत तिचा संबंध मुळाक्षरांशी जोडला गेल्याने ती काहीशी संदिग्ध झालेली आहे. वर्णमाला ही उच्चारांवरून ठरवावी लागते, उलट मुळाक्षरांचा संबंध लिपीशी असतो. ध्वनींचे उच्चारण व अक्षरांचे लेखन यांमध्ये दरी असतेच; अगदी देवनागरी लिपीच्या बाबतीतही ती आहेच, हे ध्यानात घ्यायला हवे.[५]

भाषेत ध्वनी असतात, परंतु ते रचित स्वरूपात असतात, म्हणजे त्यांना व्यवच्छेदकत्व दिल्याखेरीज ते स्वनिम म्हणून वावरू शकत नाहीत. मराठीमध्ये 'कळ-खळ'या प्रकारच्या जोड्यांवरून 'क' आणि 'ख' हे स्वनिम आहेत, म्हणजेच ती स्वतंत्र, व्यवच्छेदक ध्वनिरूपे आहेत. याउलट इंग्लिशमध्ये 'क' आणि 'ख' यांच्यातील भेद व्यवच्छेदक नाही, म्हणजेच ती स्वतंत्र ध्वनिरूपे नाहीत. येथे व्यवच्छेदकत्व ठरविताना अर्थाचा उपयोग केलेला आहे, ही गोष्ट खरी. परंतु त्यामुळे अर्थ हा मूलभूत तर रूपे ही दुय्यम असे सिद्ध होत नाही.

शब्दांच्या अवयवावरील आघात किंवा बल (भार) (स्ट्रेस) हा मराठीमध्ये रचनात्मक दृष्टीने पाहता व्यवच्छेदक नाही, परंतु इंग्लिशमध्ये subject, object,





अनुक्रमणिका

produce यांसारख्या काही मोजक्या शब्दांच्या बाबतींत तो व्यवच्छेदक आहे हे स्पष्ट आहे : subject हा शब्द नाम म्हणून वापरताना 'subject असा आद्यस्थानी आघात देऊन उच्चारावा लागतो तर क्रियापद म्हणून वापरताना sub'ject असा दुसऱ्या अवयवावर आघात देऊन उच्चारावा लागतो. नेमका हाच नियम object आणि produce या शब्दांनाही लागू पडतो. भारतीय इंग्लिशमध्ये हा नियम पाळला जात नाही, आणि भारतामध्ये इंग्लिशचे शिक्षण प्रामुख्याने लेखी भाषेद्वारे मिळत असल्याने हा बोलभाषेचा नियम आपल्याला माहीतही नसतो.

पारंपरिक व्याकरणामध्ये शब्दजातींच्या व्याख्या या बव्हंशी अर्थाधिष्ठित होत्या. उदाहरणार्थ, ''नाम म्हणजे पदार्थमात्राचे नाव.'' या प्रकारच्या व्याख्यांऐवजी रूपाधिष्ठित आणि रचनाधिष्ठित व्याख्या व्याकरणाला देता यायला हव्यात, असा आग्रह आधुनिक संरचनावादी भाषा वैज्ञानिकांनी धरला. शब्दजातींना 'रूपजाती' (फॉर्म-क्लासिझ) असे मानून त्यांचे रूपाधिष्ठित वर्णन करणे, हे व्याकरणाचे एक महत्त्वाचे उद्दिष्ट मानले जाऊ लागले. पदांना कोणत्या प्रकारचे विकार होतात त्यांची यादी देणे आणि पदे कोणत्या पदबंधामध्ये येऊ शकतात हे सांगणे, या दोन निकषांच्या आधारे इंग्लिशमधील रूपजातींची नेटकी चर्चा बार्बारा स्ट्रँग यांनी 'मॉडर्न इंग्लिश स्ट्रक्चर' या ग्रंथामध्ये केलेली आहे (पाहा : Strang,1969)

आता आपण वरवर पाहता अधिष्ठित वाटणाऱ्या काही व्याकरणिक कोटींकडे वळू. या कोटी म्हणजे वचन, लिंग आणि काळ होत. वचन हे एक व अनेक यांच्यातील अर्थभेदासाठी वापरले जाते, लिंग हे पुरुषत्व व स्त्रीत्व यांच्यातील अर्थभेदासाठी वापरले जाते, तर काळ हा भूत, वर्तमान आणि भविष्य यांच्यातील अर्थभेदासाठी वापरला जातो, असे वरवर पाहता वाटेल. परंतु व्याकरणाच्या किंवा भाषिक व्यवस्थेच्या दृष्टीने विचार करता या कोटी अर्थाधिष्ठित नसून त्या प्रत्ययांच्या स्वरूपाच्या किंवा विकारांच्या स्वरूपाच्या आहेत असे म्हणावे लागते. त्यांना अर्थाधिष्ठित मानले तर प्रचंड गोंधळाची परिस्थिती निर्माण होते, हे लक्षात घ्यायला हवे.

वचन हा नामांना होणारा विकार आहे. एक वस्तू व अनेक वस्तू यांच्या निर्देशासाठी तो येतो असे म्हणावे तर संस्कृत आणि अरेबिक या भाषांमध्ये द्विवचन आहे, म्हणजेच रूपाच्या पातळीवर एक-दोन-दोनापेक्षा अधिक असा भेद आहे. चिनी व जपानी भाषांमध्ये नामांच्या विकारामध्ये हा भेदच नाही. अर्थ हा भाषेत मध्यवर्ती असता तर असे होण्याचे कारणच नव्हते. कारण एक व एकापेक्षा अधिक असा भेद सर्वच समाजांमध्ये केला जातो. परंतु भाषिक रूपांमध्ये हा भेद आहे की नाही,

म्हणजेच हा भेद व्याकरणिक आहे की नाही, हा मुद्दा महत्त्वाचा आहे.

संस्कृतमधील द्विवचनाविषयी एक भाबडा, परंपरानिष्ठ मुद्दा बऱ्याचदा मांडला जातो. तो असा की हात, पाय, डोळे, कान इत्यादी अवयवांचा निर्देश करणाऱ्या नामांना द्विवचनाची रूपे असल्याने फारच मोठी सोय होते, कारण प्रत्येक वेळी दोन कान, दोन डोळे वगैरे उल्लेख करावे लागत नाहीत. उदाहरणार्थ, नृत्यामधील मुद्रा वगैरेविषयीचे विवेचन करताना द्विवचनी रूपांची सोय खूपच उपयोगी पडते. परंतु हा युक्तिवाद अजिबात टिकणारा नाही. आशयानुसार वा कार्यानुसार संस्कृतमधील (वा कोणत्याही मानवी भाषेतील) रूपे निश्चित होत असती तर ती केवळ या नामांपुरतीच मर्यादित राहिली असती. परंतु संस्कृतमधील द्विवचन हे या प्रकारच्या नामांपुरते मर्यादित नाही, तर सर्वच नामांना द्विवचनाची रूपे असतात. मस्तक, हृदय, सूर्य, चंद्र, नदी, वृक्ष, राम ... यांसारख्या नामांना द्विवचनी रूपे असणे ही संदेशनाच्या दृष्टीने सोय म्हणायची की गैरसोय? आणि ही द्विवचनी रूपे संस्कृतमध्ये किती प्रमाणात वापरली जात असावीत याचे संख्याशास्त्रीय विश्लेषणच व्हायला हवे.

लिंगाच्या बाबतीत तर अर्थ या संकल्पनेची परिस्थिती फारच गोंधळाची आहे. मराठीसारख्या भाषेत पुल्लिंग व स्त्रीलिंग या नेहमीच्या भेदाबरोबरच नपुसकलिंग असा एकभेद आढळतो. या तिहेरी भेदव्यवस्थेला अर्थाचा वा आशयाचा काहीही आधार नाही, तर ती पूर्णपणे यादृच्छिक स्वरूपाची आहे, हे सहज लक्षात येईल. पंखा, खुर्ची आणि टेबल हे अचेतन वस्तूंचा निर्देश करणारे शब्द अर्थाच्या दृष्टीने अनुक्रमे पुल्लिंगी, स्त्रीलिंगी व नपुसकलिंगी आहेत का ? प्रा. कामत यांची भूमिका ग्राह्य धरली तर अर्थाच्या दृष्टीने याला काहीही आधार नाही आणि म्हणून मराठीने लिंगव्यवस्था टाकून द्यायला हवी, असा निष्कर्ष काढावा लागेल. स्वाहिली या आफ्रिकन भाषेमध्ये आठ प्रकारचे लिंगभेद आढळतात, आणि त्यांचा लिंगभावाशी काहीही संबंध आढळत नाही. इंग्लिशमध्ये सर्वनामांनी होणारे निर्देश सोडले तर नामांच्या पुल्लिंग/स्त्रीलिंग या दुहेरी लिंगव्यवस्थेला व्याकरणामध्ये काहीही स्थान नाही, कारण धातुरूपांवर तिचा काहीही परिणाम होत नाही. तेव्हा, लिंगव्यवस्था (जेंडर सिस्टिम) ही भाषिक संरचनेच्या म्हणजेच व्याकरणाच्या अंतर्गत बाब आहे; तिचा लिंगभावाशी म्हणजेच लिंगविषयक आशयाशी (सेक्शुअल मीनिंग) संबंध नसतो, ही गोष्ट ध्यानात ठेवायला हवी.

'काळ' ही व्याकरणिक कोटी काही भाषांच्या बाबतीत धातुरूपे निश्चित करते. मराठीमध्ये मूळ 'जा' या धातूची तीन रूपे काळानुसार होतात : 'जातो/जाते' ही वर्तमानाची रूपे, 'गेला/गेली/गेले' ही भूतकाळाची रूपे, तर 'जाईल' हे

भविष्यकाळाचे रूप, अशी व्यवस्था पारंपरिक व्याकरणात लावली जाते. हिंदीच्या काळरूपांची तुलना करता या व्यवस्थेचे वेगळेपण म्हणजे मराठीमध्ये ही रूपव्यवस्था तिहेरी भेदस्वरूपांची आहे; उलट हिंदीमध्ये : 'जाता है/जाती है' ही वर्तमानाची रूपे, 'गया/गयी' ही भूतकाळाची रूपे, तर 'जाएगा/जाएगी' ही भविष्यकाळाची रूपे, अशी व्यवस्था आढळते. म्हणजेच हिंदीमध्ये वर्तमानकाळाची रूपे साहायक क्रियापदाशिवाय सिद्धच होऊ शकत नाहीत; मराठीत मात्र साहायकाची गरज पडत नाही. इंग्लिशमध्ये go या धातूची वर्तमानकाळाची go/goes अशी रूपे होतात तर went हे भूतकाळी रूप होते. मात्र भविष्यकाळी रूपांसाठी shall/will ही साहायक क्रियापदे वापरून रचना करावी लागते. या सर्व रचनांची पदांच्या पातळीवर व्यवस्था लावायची तर असे म्हणता येईल की फक्त मराठीमध्येच काळरूपांची तिहेरी भेदव्यवस्था आहे. हिंदी व इंग्लिश या भाषांमध्ये पदांच्या पातळीवर काळरूपांमध्ये फक्त दुहेरी भेद दिसतो. इंग्लिशमध्ये हाच दुहेरी भेद (वर्तमान/भूत) shall/will go आणि should/would go या रचनांमध्येही दाखविता येतो.[६] हिंदीमध्येही पदरूपांच्या सिद्धीच्या पातळीवर भूत/भविष्य असा दुहेरी भेदच आढळतो. तेव्हा जगातल्या सर्व भाषांमध्ये भूत, वर्तमान, भविष्य अशा तीन काळांची रूपे सिद्ध झालेली आढळतात, या प्रकारच्या गृहीतकृत्यांना काहीही आधार नाही.

काळरूपांच्या बाबतीमध्ये आणखी एक मुद्दा ध्यानात घ्यायला हवा. व्याकरणिक काळरूपे आणि वास्तव जगातील काळाचे मानवाने केलेले भूत-वर्तमान-भविष्य हे तार्किक विभाजन किंवा काळाचा आशय यांमध्ये एकास-एक असे नाते आढळत नाही. मराठीमधील वर्तमानकाळाची रूपे वर्तमानाचा आशय व्यक्त करतात का ? ''तो (रोज) वर्तमानपत्र वाचतो.'' या वाक्यातील 'वाचतो' हे व्याकरणिक रूप साध्या वर्तमानाचे असले तरी वाक्यामधून वर्तमानकाळाचा आशय व्यक्त होत नसून नेहमी घडणाऱ्या क्रियेचा आशय व्यक्त होतो. ''पृथ्वी सूर्याभोवती फिरते'' या वाक्याचा व्याकरणिक काळ वर्तमान असला तरी त्याचा कालात्म आशय हा सार्वत्रिक सत्याचा आहे. ''पृथ्वी सूर्याभोवती फिरली'' आणि ''पृथ्वी सूर्याभोवती फिरेल'' ही अनुक्रमे भूतकाळी व भविष्यकाळी रूपे वापरणारी वाक्ये व्याकरणशुद्ध असली तरी काळाच्या आशयाच्या दृष्टीने त्यांचे प्रयोजन काय असा प्रश्न कोणालाही पडेल ! नाटकाच्या रंगसूचनांमध्ये मात्र वर्तमानकाळी रूपांमधून वर्तमानाचा आशय व्यक्त होताना दिसतो. ''तो घरभर फेऱ्या मारतो.'' हे वाक्य नेहमीच्या व्यवहारात वापरले गेले तर त्यातून नित्य घडणाऱ्या क्रियेचा आशय व्यक्त होईल, तर हेच वाक्य रंगसूचनांमध्ये आले तर त्यामधून वर्तमानात घडणाऱ्या क्रियेचा आशय व्यक्त होईल. या उलट क्रिकेटच्या





अनुक्रमणिका

किंवा अन्य क्रीडाप्रकारांच्या समालोचनामध्ये भूतकाळी रूपांचा वापर वर्तमानकाळात घडणाऱ्या क्रियेचे वर्णन करण्यासाठी केला जातो; उदाहरणार्थ, ''त्याने चेंडू उचलला.'' या वाक्यातील 'उचलला' हे व्याकरणिक रूप साध्या भूतकाळाचे असले तरी या रूपाचे समालोचनाच्या संदर्भातील कार्य हे वर्तमानात घडत असणाऱ्या व समोर दिसणाऱ्या क्रियेचे साक्षात वर्णन करणे असे आहे. येथे 'उचलतो' हे साध्या वर्तमानकाळाचे रूप मराठीत चालणार नाही. या उलट इंग्लिशमध्ये मात्र क्रीडासमालोचनांमध्ये He picks/picked up the ball. अशी दोन्ही रूपे चालू शकतात. इंग्लिशमध्येही काळरूपे आणि कालात्म आशय यात नेमका संबंध आढळत नाही : I am flying to Delhi (tomorrow). ही रचना रूपाच्या दृष्टीने अपूर्ण वर्तमानाची असली तरी आशयाच्या दृष्टीने तिचा वापर भविष्याचा अर्थ व्यक्त करण्यासाठी होतो, हे उघड आहे. चिनी भाषेमध्ये काळाचा आशय व्यक्त करण्यासाठी वेगळी क्रियापदरूपेच नाहीत ! म्हणजेच या भाषेच्या व्याकरणिक व्यवस्थेमध्ये काळरूपे नाहीत. वेगळे शब्द वापरून (उदा० काल, आज, उद्या, इ.०सारखे) हा आशय व्यक्त केला जातो. याच्या अगदी विरुद्ध टोकाला पश्चिम आफ्रिकेतील एका भाषेत प्रत्येक धातूला अकरा रूपे असतात; त्यातील एक रूप वर्तमानाचा आशय व्यक्त करते, तर पाच रूपे भूतकाळाच्या आशयाच्या पाच वेगवेगळ्या छटा व्यक्त करतात आणि आणखी पाच भविष्यकाळाच्या आशयाच्या पाच वेगवेगळ्या छटा व्यक्त करतात !

तेव्हा, लिंग, वचन आणि काळ या व्याकरणिक कोटी आहेत ही गोष्ट नीटपणे ध्यानात घ्यायला हवी. या कोटी वेगवेगळ्या प्रकारचे अर्थ किंवा आशय वेगवेगळ्या भाषांमध्ये व्यक्त करू पाहतात. म्हणजेच त्यांची संदेशनात्मक कार्ये भाषेभाषेनुसार बदलतात.

या कोटींनंतर आपण सर्वनामांकडे वळू. सर्वनामे ही नामांच्या ऐवजी वापरली जातात हे आपल्याला माहिती आहे. सर्वनामांचा तो अर्थच किंवा आशयच आहे. आता एखाद्या वाक्यात एक नाम आणि एक सर्वनाम आले तर आपण म्हणू की नामाऐवजी सर्वनामांचा वापर केला. पुढील वाक्ये पहा :

१. कमल उठल्यावर तिने चहा केला.

२. ती उठल्यावर कमलने चहा केला.

३. कमलने ती उठल्यावर चहा केला.

यापैकी प्रत्येक वाक्यात कमल हे नाम आणि 'ती' हे सर्वनाम वापरलेले आहे. येथे 'ती' हे सर्वनाम कमल या नामासाठी वापरलेले आहे का ? या तीनही वाक्यांमध्ये

'ती' या सर्वनामाने निर्देशिलेली व्यक्ती कमल नसून विमल असू शकते.

१अ. कमल उठल्यावर विमलने चहा केला.

२अ. विमल उठल्यावर कमलने चहा केला.

३अ कमलने विमल उठल्यावर चहा केला.

आता प्रश्न असा की यांपैकी कोणत्या वाक्यात 'ती' या सर्वनामाने कमलचा निर्देश होऊ शकतो ? थोडा विचार केला तर फक्त पहिल्या वाक्यातच तो होऊ शकतो, हे ध्यानात येईल. उठणे व चहा करणे या क्रियापदांचा कर्ता असणारी व्यक्ती एकच असू शकते ती फक्त पहिल्या वाक्यात. इतर वाक्यांत ती तशी असेल तरी ती वाक्ये व्याकरणदुष्ट वाक्ये ठरतील.

येथे अर्थाचा वा संदर्भाचा काही संबंध येत नाही. व्याकरणाचा किंवा वाक्यरचनेच्या नियमाचा हा भाग आहे. या नियमाची मांडणी कशी करायची हा भाग वेगळा. पण मराठीचे ज्ञान असणारी कोणतीही व्यक्ती वाक्य क्र. २ वा ३ यांमध्ये 'ती' हे सर्वनाम कमल या नामाच्या निर्देशासाठी वापरणार नाही. तसे वापरले तर ही वाक्ये व्याकरणदुष्ट ठरतील. तेव्हा, सर्वनामांचे व्याकरण हे त्यांच्या अर्थावर किंवा संदेशनात्मक कार्यावर अवलंबून नसते, हे यावरून स्पष्ट व्हावे.

नोम चॉम्स्की यांनी आपल्या व्याकरणिक सिद्धांतामध्ये 'वाक्य' हा घटक गाभ्याचा मानून व्याकरणव्यवस्थेची मांडणी केलेली आहे. १९५७ पासून ते अगदी २०००पर्यंत त्यांनी हीच भूमिका सातत्याने विकसित केलेली आहे. मात्र त्यांच्या काही शिष्यांनी भाषिक व्यवस्थेमध्ये पायाभूत रचनाबंध हा तार्किक किंवा अर्थस्वरूपी रचनांचा असतो व वाक्यरचना सापेक्षत: गौण असते, अशी वरवर पाहाता बिनतोड वाटणारी भूमिका घेऊन अर्थरचनेची मांडणी करायला १९७०च्या आसपास प्रारंभ केला. परंतु या मांडणीतून भाषेची एकूण व्यवस्था स्पष्ट होण्याऐवजी रचनेची कल्पना अधिकच समस्याग्रस्त होऊन बसली; आणि अखेर हा प्रयत्न अशास्त्रीय म्हणून सोडून द्यावा लागला. या प्रयत्नाला 'जनरेटिव्ह सिमँटिक्स' असे नाव आहे.

### चार

विशिष्ट आशय किंवा अर्थ व्यक्त करण्यासाठी कोणती व्याकरणिक रूपे उपलब्ध असतात, अशा प्रकारचा एक आशयनिष्ठ किंवा संदेशननिष्ठ व्याकरण लिहिण्याचा प्रयत्न इंग्लिशच्या व्याकरणकारांनी केलेला आहे. त्याची येथे दखल घ्यायला हवी. जेफ्रि लीच आणि यान स्वार्तविक या लेखकांनी 'अ कम्यूनिकेटिव्ह ग्रॅमर ऑफ इंग्लिश' या ग्रंथामध्ये (Leech & Svartvik, 1973) संदेशनप्रक्रियेमधील अर्थाचे वा आशयाचे चार स्तर मानलेले आहेत आणि त्यांचा इंग्लिश भाषेतील व्याकरणिक रूपे






व रचना यांच्याशी काय संबंध आहे, याची एक मोठी यादीच तयार केली आहे. त्यांच्या मांडणीचा थोडक्यात विचार करू.[८]

अर्थाच्या गाभ्याच्या स्तराला ते 'संकल्पना' (कॉन्सेप्टस्) म्हणतात आणि त्याची अभिव्यक्ती शब्द, पदबंध आणि वाक्यांश या व्याकरणिक एककांच्या संदर्भात तपासतात. उदाहरणार्थ, मूर्त पातळीवरील वस्तूंचा निर्देश करताना एकवचन आणि अनेकवचन या नामांच्या रूपांचा उपयोग कसा होतो, गणनशील व अगणनशील नामे कशी वापरली जातात, वस्तूंचे भाग कसे केले जातात, याची मांडणी आहे. अमूर्त पातळीवर अवस्था, घटना, भावना इत्यादी अर्थ इंग्लिशमध्ये कसे व्यक्त होतात याचा विचार वेगवेगळ्या पातळ्यांवर त्यांनी केलेला आहे. अर्थाचा दुसरा स्तर म्हणजे माहिती, वास्तव (विश्व) आणि धारणा (इन्फर्मेशन, रिॲलटि अँड बिलीफ) असा मानलेला आहे, आणि त्याचा विचार वाक्य या व्याकरणिक पातळीवर केलेला आहे. उदाहरणार्थ, इंग्लिशमध्ये विधाने कशी केली जातात, प्रश्न कसे विचारले जातात, शक्यता कशी वर्तविली जाते, इत्यादींचा विचार येथे येतो. अर्थाची तिसरी पातळी म्हणजे संदेशनप्रक्रियेतील प्रेषक आणि ग्रहणकर्ती व्यक्ती यांचे दृष्टिकोन, भावना इत्यादी कसे व्यक्त होतात याचा विचार 'उच्चारिते' (अटरन्सिझ) या भाषिक पातळीवर केलेला आहे. उदाहरणार्थ, आज्ञा देणे, विनंती करणे, सुचविणे, धमकी देणे, वचन देणे या प्रकारची उच्चारिते अर्थ कसा व्यक्त करतात हे तपासले आहे. अर्थाचा चौथा स्तर म्हणजे सलग, अखंड संभाषिताचा समग्र अर्थ असा मानून संभाषित किंवा संहिता (डिस्कोर्स टेक्स्ट) या रचनेच्या पातळीवर या अर्थाचे स्वरूप काय असते, याचे विश्लेषण केले आहे. उदाहरणार्थ, दोन वाक्यांना जोडणारे 'तेव्हा', 'परंतु', 'शिवाय', 'आणि', 'मग', 'उदाहरणार्थ' या प्रकारचे शब्द, किंवा ''असे असले तरीही'', ''तसे पाहिले तर'', ''थोडक्यात सांगायचे तर'', ''तसे असते तर'', ''अधिक सामान्य पातळीवर बोलायचे तर'', या प्रकारच्या रचना, यांमधून किती विविध प्रकारचे अर्थ संभाषिताला वा संहितेला प्राप्त होऊ शकतात याची चर्चा येथे करता येते. मराठीमध्ये या प्रकारचा प्रयत्न कोणी गंभीरपणे केलेला नाही. तसा तो झाला तर मराठी भाषा शिकविण्याच्या दृष्टीने तो अत्यंत उपयुक्त ठरेल.

भाषेचा सामाजिक व सांस्कृतिक आशय, त्याचप्रमाणे तिचे संदर्भलक्ष्यी कार्य यांचा अभ्यास करणारे 'प्रॅग्मॅटिक्स' विकसित होते आहे. या अभ्यासक्षेत्रामध्ये भाषिक अर्थ हा सामाजिक संदर्भावर आधारलेला असतो, असे गृहीत धरलेले असते, आणि भाषेच्या कार्यांची वेगवेगळ्या तत्त्वांनुसार व्यवस्था लावलेली असते. या अंगाने मराठी भाषेचे विश्लेषण जवळपास झालेलेच नाही असे म्हटले तरी चालेल. या प्रकारच्या

'ती' या सर्वनामाने निर्देशिलेली व्यक्ती कमल नसून विमल असू शकते.

१अ. कमल उठल्यावर विमलने चहा केला.

२अ. विमल उठल्यावर कमलने चहा केला.

३अ कमलने विमल उठल्यावर चहा केला.

आता प्रश्न असा की यांपैकी कोणत्या वाक्यात 'ती' या सर्वनामाने कमलचा निर्देश होऊ शकतो ? थोडा विचार केला तर फक्त पहिल्या वाक्यातच तो होऊ शकतो, हे ध्यानात येईल. उठणे व चहा करणे या क्रियापदांचा कर्ता असणारी व्यक्ती एकच असू शकते ती फक्त पहिल्या वाक्यात. इतर वाक्यांत ती तशी असेल तरी ती वाक्ये व्याकरणदुष्ट वाक्ये ठरतील.

येथे अर्थाचा वा संदर्भाचा काही संबंध येत नाही. व्याकरणाचा किंवा वाक्यरचनेच्या नियमाचा हा भाग आहे. या नियमाची मांडणी कशी करायची हा भाग वेगळा. पण मराठीचे ज्ञान असणारी कोणतीही व्यक्ती वाक्य क्र. २ वा ३ यांमध्ये 'ती' हे सर्वनाम कमल या नामाच्या निर्देशासाठी वापरणार नाही. तसे वापरले तर ही वाक्ये व्याकरणदुष्ट ठरतील. तेव्हा, सर्वनामांचे व्याकरण हे त्यांच्या अर्थावर किंवा संदेशनात्मक कार्यावर अवलंबून नसते, हे यावरून स्पष्ट व्हावे.

नोम चॉम्स्की यांनी आपल्या व्याकरणिक सिद्धांतामध्ये 'वाक्य' हा घटक गाभ्याचा मानून व्याकरणव्यवस्थेची मांडणी केलेली आहे. १९५७ पासून ते अगदी २०००पर्यंत त्यांनी हीच भूमिका सातत्याने विकसित केलेली आहे. मात्र त्यांच्या काही शिष्यांनी भाषिक व्यवस्थेमध्ये पायाभूत रचनाबंध हा तार्किक किंवा अर्थस्वरूपी रचनांचा असतो व वाक्यरचना सापेक्षतः गौण असते, अशी वरवर पाहाता बिनतोड वाटणारी भूमिका घेऊन अर्थरचनेची मांडणी करायला १९७०च्या आसपास प्रारंभ केला. परंतु या मांडणीतून भाषेची एकूण व्यवस्था स्पष्ट होण्याऐवजी रचनेची कल्पना अधिकच समस्याग्रस्त होऊन बसली; आणि अखेर हा प्रयत्न अशास्त्रीय म्हणून सोडून द्यावा लागला. या प्रयत्नाला 'जनरेटिव्ह सिमँटिक्स' असे नाव आहे.

### चार

विशिष्ट आशय किंवा अर्थ व्यक्त करण्यासाठी कोणती व्याकरणिक रूपे उपलब्ध असतात, अशा प्रकारचा एक आशयनिष्ठ किंवा संदेशननिष्ठ व्याकरण लिहिण्याचा प्रयत्न इंग्लिशच्या व्याकरणकारांनी केलेला आहे. त्याची येथे दखल घ्यायला हवी. जेफ्रि लीच आणि यान स्वार्तविक या लेखकांनी 'अ कम्यूनिकेटिव्ह ग्रॅमर ऑफ इंग्लिश' या ग्रंथामध्ये (Leech & Svartvik, 1973) संदेशनप्रक्रियेमधील अर्थाचे वा आशयाचे चार स्तर मानलेले आहेत आणि त्यांचा इंग्लिश भाषेतील व्याकरणिक रूपे









व रचना यांच्याशी काय संबंध आहे, याची एक मोठी यादीच तयार केली आहे. त्यांच्या मांडणीचा थोडक्यात विचार करू.[८]

अर्थाच्या गाभ्याच्या स्तराला ते 'संकल्पना' (कॉन्सेप्टस्) म्हणतात आणि त्याची अभिव्यक्ती शब्द, पदबंध आणि वाक्यांश या व्याकरणिक एककांच्या संदर्भात तपासतात. उदाहरणार्थ, मूर्त पातळीवरील वस्तूंचा निर्देश करताना एकवचन आणि अनेकवचन या नामांच्या रूपांचा उपयोग कसा होतो, गणनशील व अगणनशील नामे कशी वापरली जातात, वस्तूंचे भाग कसे केले जातात, याची मांडणी आहे. अमूर्त पातळीवर अवस्था, घटना, भावना इत्यादी अर्थ इंग्लिशमध्ये कसे व्यक्त होतात याचा विचार वेगवेगळ्या पातळ्यांवर त्यांनी केलेला आहे. अर्थाचा दुसरा स्तर म्हणजे माहिती, वास्तव (विश्व) आणि धारणा (इन्फर्मेशन, रिॲलटि अँड बिलीफ) असा मानलेला आहे, आणि त्याचा विचार वाक्य या व्याकरणिक पातळीवर केलेला आहे. उदाहरणार्थ, इंग्लिशमध्ये विधाने कशी केली जातात, प्रश्न कसे विचारले जातात, शक्यता कशी वर्तविली जाते, इत्यादींचा विचार येथे येतो. अर्थाची तिसरी पातळी म्हणजे संदेशनप्रक्रियेतील प्रेषक आणि ग्रहणकर्ती व्यक्ती यांचे दृष्टिकोन, भावना इत्यादी कसे व्यक्त होतात याचा विचार 'उच्चारिते' (अटरन्सिझ) या भाषिक पातळीवर केलेला आहे. उदाहरणार्थ, आज्ञा देणे, विनंती करणे, सुचविणे, धमकी देणे, वचन देणे या प्रकारची उच्चारिते अर्थ कसा व्यक्त करतात हे तपासले आहे. अर्थाचा चौथा स्तर म्हणजे सलग, अखंड संभाषिताचा समग्र अर्थ असा मानून संभाषित किंवा संहिता (डिस्कोर्स टेक्स्ट) या रचनेच्या पातळीवर या अर्थाचे स्वरूप काय असते, याचे विश्लेषण केले आहे. उदाहरणार्थ, दोन वाक्यांना जोडणारे 'तेव्हा', 'परंतु', 'शिवाय', 'आणि', 'मग', 'उदाहरणार्थ' या प्रकारचे शब्द, किंवा ''असे असले तरीही'', ''तसे पाहिले तर'', ''थोडक्यात सांगायचे तर'', ''तसे असते तर'', ''अधिक सामान्य पातळीवर बोलायचे तर'', या प्रकारच्या रचना, यांमधून किती विविध प्रकारचे अर्थ संभाषिताला वा संहितेला प्राप्त होऊ शकतात याची चर्चा येथे करता येते. मराठीमध्ये या प्रकारचा प्रयत्न कोणी गंभीरपणे केलेला नाही. तसा तो झाला तर मराठी भाषा शिकविण्याच्या दृष्टीने तो अत्यंत उपयुक्त ठरेल.

भाषेचा सामाजिक व सांस्कृतिक आशय, त्याचप्रमाणे तिचे संदर्भलक्ष्यी कार्य यांचा अभ्यास करणारे 'प्रॅग्मॅटिक्स' विकसित होते आहे. या अभ्यासक्षेत्रामध्ये भाषिक अर्थ हा सामाजिक संदर्भावर आधारलेला असतो, असे गृहीत धरलेले असते, आणि भाषेच्या कार्यांची वेगवेगळ्या तत्त्वांनुसार व्यवस्था लावलेली असते. या अंगाने मराठी भाषेचे विश्लेषण जवळपास झालेलेच नाही असे म्हटले तरी चालेल. या प्रकारच्या

विश्लेषणात ध्वनी, शब्द किंवा वाक्ये या रचनेच्या पातळ्यांना फारच कमी महत्त्व असते. वाक्यांच्या पलीकडे जाऊन वाक्यबंध किंवा संभाषित किंवा संहिता कशी रचली जाते, त्याचा तपशीलवार विचार येथे अभिप्रेत असतो. एक उदाहरण पहा :

*''मराठी व्याकरणाचा पुनर्विचार करताना काही मूलभूत आणि व्यापक प्रश्नांचा संदर्भ मनात ठेवणे आवश्यक आहे. भाषेला मानवाच्या सामाजिक जीवनामध्ये मूलभूत स्थान असते. प्रा. कामत यांनी मांडलेली भूमिका या पद्धतीची आहे. वैज्ञानिकदृष्टीने विचार करता दोन तत्त्वे ध्यानात घेणे आवश्यक ठरते. या भूमिकेची मांडणी काही पुरावे आणि युक्तिवाद देऊन पुढील छेदकांमध्ये आपण करू. भाषिक रूपांना अर्थ असतो, आणि तो संदर्भाश्रित असतो. तसे वापरले तर ही वाक्ये चुकीची ठरतील.''*

ही सर्व वाक्ये याच लेखात आधी येऊन गेलेली आहेत, आणि त्यांत शब्दरूपांच्या आणि वाक्यरचनेच्या दृष्टीने काहीही दोष नाही. परंतु या प्रकारचे लेखन आपण फार काळ वाचूच शकणार नाही, कारण वाक्यांतील परस्परसंबंधच येथे गायब झालेले आहेत. एकूण भाषिक संदेशनाचा रोख, त्यातील अर्थाचे संघटन यांचा विचार करता येथे रचनातत्त्वच आढळत नाही. तेव्हा ध्वनी, शब्दरूपे आणि वाक्यरचना यांच्या पलीकडची रचनेची एक पातळी भाषेला असते. या पातळीचा निर्देश करण्यासाठी 'संभाषित' (डिस्कोर्स) अशी एक नवी संकल्पना वापरली जाते.

भाषेच्या कार्यलक्ष्यी अभ्यासामध्ये अनेक विश्लेषणपद्धती विकसित झालेल्या आहेत. याकबसन या भाषावैज्ञानिकाने भाषिक संदेशनाच्या प्रक्रियेमध्ये सहा मूलघटक असतात असे मानून या प्रत्येक मूलघटकाला प्राधान्य देऊन सहा प्रकारची कार्ये कशी निर्माण होतात हे दाखवून दिले आहे. जे. एल्.ऑस्टिन या तत्त्वज्ञाने 'वाचिक कृती' (स्पीच ॲक्ट्स) ही संकल्पना मांडून भाषेच्या संदर्भनिष्ठ कार्याच्या अभ्यासाला एक नवी दिशा दिली आहे. पॉल ग्राइस या अभ्यासकाला संभाषणातील परस्परप्रक्रियांचे विश्लेषण करताना काही 'संभाषणात्मक गृहीतकृत्ये' (कॉन्व्हर्सेशनल इंप्लिकेचर्झ) आढळली : सत्य बोलणे, माफक वा गरज असेल तेवढेच बोलणे, विषयाला धरून बोलणे, सुस्पष्ट बोलणे. वरवर पाहता ही तत्त्वे फार क्षुल्लक वाटतील. परंतु प्रत्यक्ष संभाषिताच्या रचनेचा विचार केला तर त्यांचे महत्त्व सहज लक्षात येईल. या तत्त्वांना जाणीवपूर्वक छेदही देता येतो व त्यातून अधिक सखोल पातळीवर संभाषण नेता येते. या सर्व विश्लेषणपद्धतींचा परिचय करून देणे हा एका वेगळ्या लेखाचा वा ग्रंथाचा विषय होईल. मात्र अभ्यास कसा चालतो याची कल्पना येण्यासाठी हे विवेचन केले.

पाच

कोणत्याही वैज्ञानिक क्षेत्रातील संशोधन हे त्या क्षेत्रात अधिकाधिक सखोल ज्ञान

आणि मर्मदृष्टी प्राप्त करण्यासाठी होत असते.[९] न्यूटन किंवा आइनस्टाइन यांनी पदार्थविज्ञान वा भौतिकीमध्ये संशोधन करून जे सिद्धांत मांडले ते तो विषय अध्यापनाला सोपा जावा म्हणून मांडले नाहीत. पदार्थविज्ञानाचे अध्यापन प्रभावीपणे कसे करावे, हा एक स्वतंत्र विषय आहे. पदार्थविज्ञानातील सैद्धांतिक संशोधनाशी त्याची गल्लत करून चालणार नाही. भाषाविज्ञानालाही हेच तत्त्व लागू पडते. भाषा शिकवण्यासाठी कोणती पद्धती वापरावी, कोणत्या प्रकारचे व्याकरण वापरावे, हा स्वतंत्र प्रश्न आहे. भाषेच्या स्वरूपाविषयी भाषाविज्ञानामध्ये जे सैद्धांतिक पातळीवरचे संशोधन चालू आहे, त्याच्याशी या प्रश्नाची गल्लत करून चालणार नाही. वैज्ञानिक अभ्यासामधून भाषेच्या स्वरूपाविषयी, त्याचप्रमाणे भाषेचे आत्मसातीकरण होण्याच्या प्रक्रियेविषयी जी तत्त्वे हाती लागतात, त्यांच्यावर आधारून अध्यापनलक्ष्यी व्याकरणांची मांडणी करावी लागेल. मात्र शास्त्रीय किंवा वैज्ञानिक व्याकरण आणि अध्यापनलक्ष्यी व्याकरण यांच्या मूल्यमापनाचे निकष वेगळेच ठेवायला हवेत.

----------

टिपा :

१. प्रा. उमाकांत रा. कामत यांनी ''व्याकरणविषयक एक विचार'' (कामत २००६) या लेखात या विषयासंबंधी काही प्रश्न उपस्थित केलेले आहेत. या निबंधावर आधारून ''मराठी व्याकरणाचा पुनर्विचार'' या विषयावर एक चर्चासत्र १ मे, २००६ रोजी मराठी अभ्यास परिषद आणि महाराष्ट्र साहित्य परिषद या संस्थांच्या विद्यमाने घडून आले. या चर्चासत्रामध्ये प्रस्तुत निबंधाचा पहिला खर्डा मांडला. त्यावर झालेली चर्चा आणि प्रा. प्र.ना. परांजपे यांनी केलेल्या सूचना लक्षात घेऊन प्रस्तुत निबंधात भर घातलेली आहे.

२. प्रा. कामत यांनी मांडलेली भूमिका या पद्धतीची आहे : ''मानवी व्यक्तीचे परिसराविषयीचे आकलन आविष्कृत करणे व ते इतर व्यक्तींपर्यंत पोचविणे हे भाषेचे मूळ उद्दिष्टकार्य आहे. ते नजरेआड करून कोणताही भाषिक अभ्यास शास्त्रीय होऊ शकणार नाही, हे उघड आहे. अर्थाभिव्यक्ती व अर्थवहन हाच भाषेचा पाया असतो. तो उपेक्षून उभी केलेली भाषिक अभ्यासाची इमारत म्हणजे मुळापासून तोडलेली वृक्षाची निर्जीव फांदी ठरेल.'' (पृ.२०). ही भूमिका भाषेच्या सामाजिक व सांस्कृतिक कार्यावर अतिरिक्त भर देणारी आहे. भाषेच्या अभ्यासातही याच गोष्टींवर भर असावा असे त्यांना वाटते. मराठीमध्ये भाषेच्या स्वरूपाविषयी चर्चा करणारे, विशिष्ट भूमिका मांडणारे लेखन फार कमी झालेले आहे. प्रा. कामत यांनी स्पष्टपणे एक भूमिका मांडल्यामुळे चर्चेला चालना मिळाली आहे, यात शंकाच नाही.

३. प्रा. कामत यांनी भाषेविषयीची भूमिका मांडताना आधुनिक विज्ञानाविषयीही काही मते मांडलेली आहेत : दामले यांच्या काळात पदार्थविज्ञानाने पृथक्करणात्मक पद्धती विकसित केलेली होती व तिच्या आधारे व्याकरणाचा विचार दामले यांनी मांडला, ''तथापि विसाव्या शतकाच्या उत्तरार्धात सर्व क्षेत्रांतील अभ्यासकांना यापद्धतीतील उणिवा व त्यामुळे अनुमानांना पडणाऱ्या मर्यादा स्पष्टपणे जाणवू लागल्या. पृथक्करणात्मक पद्धती कोणतीही वस्तू वा विषय यामधील घटक व त्यांचे गुणधर्म समजून घेण्यापुरती (म्हणजेच एका सीमित स्वरूपात) अभ्यासकांना उपयुक्त असली तरी त्यामुळे विषयाचे पूर्ण स्वरूप नीटपणे कळत नाही. विश्वातील सर्व घटना त्या आधारे पूर्णपणे उलगडता येत नाहीत, हे ध्यानात येऊन चुकले आहे.'' (पृ.१७) सजीवांच्या व विशेषतः मानवांच्या शास्त्रीय अभ्यासासाठी ''त्यात अंतर्भूत असणाऱ्या घटकांची रचना (स्थान, स्थिती व जुळणी), तसेच परस्परसंबंध व प्राणतत्त्व यांचा स्पष्ट विचार केला पाहिजे.'' (पृ.१८) शिवाय, वर्तनवादी भूमिका ही कशी अपुरी आहे हे दाखविताना ''मानवाचे वर्तन हे स्वतंत्र तुकड्यांचे, स्थिर वा निर्जीव नसून, प्रत्येक पातळीवर ते हेतुपूर्ण, परस्परसंबद्ध व संघटित असते. मानवाच्या प्रत्येक आकलनात व कृतीतही ही संघटना असून ती अर्थपूर्ण, परिवर्तनशील, विकसनशील, विविध रूपात्मक... व गतिशील - चैतन्यशील असते.'' (पृ.१८) असाही मुद्दा त्यांनी मांडलेला आहे. वर्तनवादी भूमिकेविषयीचा प्रा. कामत यांचा आक्षेप योग्य असला तरी विज्ञानाच्या पृथक्करणात्मक पद्धतीविषयीचे त्यांचे विवेचन अनाकलनीय आहे.

४. ''व्याकरणातही वाक्य हेच सर्व विवेचनाचा पाया असले पाहिजे''(पृ. २२) असे एक अत्यंत महत्त्वाचे विधान प्रा. कामत यांनी आपल्या लेखामध्ये केलेले आहे. परंतु त्यांना वाटते त्यापेक्षा हे विधान अधिक सखोल आहे. ''भाषेतील शब्दरूपे केव्हाही स्वतंत्रपणे अस्तित्वात येत नाहीत''हे त्यापुढचे त्यांचे विधान अगम्य आहे. भाषेत शब्दरूपे घडताना लिंग, वचन व काळाचे जे विकार होतात ते विशिष्ट अर्थ व्यक्त करण्यासाठी होत असतात, व त्यामुळे अर्थ हा मूलभूत तर विकार हे दुय्यम, अशी प्रा. कामत यांची धारणा दिसते. आपण या विकारांची काही उदाहरणे वर पाहिलेलीच आहेत.

५. प्रा. कामत यांनी ''मूळ उच्चारांनाच वर्णमाला म्हटले जाते'' (पृ.२१) असे विधान केले आहे. येथे त्यांनी ध्वनींचे उच्चारण व अक्षरांचे लेखन यांमधील दरी ध्यानातच घेतलेली नाही. पुढे ते म्हणतात, ''प्रत्यक्षात भाषा जन्मताना वा विकसित होताना या मुळाक्षरांपासून ती निर्माण होत नाही. कोणत्याही भाषेतले आरंभीचे शब्द हे (उत्स्फूर्त उद्गार वा निसर्गातील ध्वनींचे अनुकरणरूप म्हणून)

संमिश्र ध्वनीच असावेत'' (पृ.२१) असेही एक अशास्त्रीय विधान केलेले आहे. मानवाची भाषा, तिचे ध्वनी हे निसर्गातील ध्वनींचे अनुकरण असते हा सिद्धांत एकोणिसाव्या शतकात स्वच्छंदतावादी विचारवंतांनी मांडलेला होता. परंतु तो अशास्त्रीय आहे कारण कोणत्याही वैज्ञानिक पुराव्याच्या आधारे त्याची तथ्यातथ्यता ठरविता येत नाही, व त्यामुळे तो कधीच मागे पडलेला आहे.

६. इंग्लिशमधील भविष्यकाळचा चकवा, या विषयावरील तपशीलवार चर्चेसाठी पाहा : मालशे, २००४ : २८-३२.

७. अधिक चर्चेसाठी पाहा : मालशे, २००४ :१००-१०३.

८. प्रा. कामत यांना भाषेचा संदर्भनिष्ठ व कार्यनिष्ठ अभ्यास अपेक्षित आहे. परंतु या अभ्यासासाठी जी संशोधनपद्धती विकसित व्हायला हवी ती मराठीमध्ये झालेली नाही. 'ला' या प्रत्ययाच्या विविध उपयोगांची जी यादी त्यांनी स्वत: दिलेली आहे (पृ.२३) तिच्यात इतक्या वेगवेगळ्या संकल्पनांची सरमिसळ झालेली आहे की त्यातून तार्किक वा आशयात्मक वा कार्यलक्ष्यी अशी कोणतीही व्यवस्था हाती लागत नाही. उदाहरणार्थ, कर्ता, संप्रदान, इत्यादी व्याकरणिक कोटींबरोबरच हेतू, संबंध, सान्निध्य, विनिमय अशा आशयात्मक कोटीही या यादीमध्ये आढळतात. त्यामुळे हा प्रयत्न फारसा शास्त्रीय नाही, असे म्हणावे लागते.

९. प्रा. कामत यांनी त्यांच्या लेखामध्ये भाषेचे शास्त्रीय व्याकरण आणि अध्यापनोपयोगी व्याकरण यांत गल्लत केलेली आहे.

-------

**संदर्भ :**

कामत, उमाकांत रा. २००६. 'व्याकरणविषयक एक विचार', भाषा आणि जीवन, वर्ष २४, अंक २, उन्हाळा २००६, पृ. १७-२८.

मालशे, मिलिंद. २००४. 'आधुनिक भाषाविज्ञान : सिद्धांत आणि उपयोजन', लोकवाङ्मय गृह, मुंबई.

मालशे, मिलिंद. २००५. ''भाषेच्या अभ्यासाची नवी क्षितिजे'', (Chomsky, 2000 चे मराठी भाषांतर), *भाषा आणि जीवन,* वर्ष २३, अंक ४, पृ. ८-३५.

Austin, J.L. 1962. 'How to Do Things with Words.' Oxford Clarendon Press.

Chomsky, Noam. 2000. "New Horizons in the Study of Language", Ch. 1 of 'New Horizons in the Study of Language and Mind.' Cambridge : CUP, pp. 3-18.

Cruse, Alan. 2004. 'Meaning in Languages : An Introduction to Semantics and Pragmatics.' Oxford : OUP.

Grice, H.P. 1975. "Logic and Conversation." In 'Syntax and Semantics, Vol. VIII, Speech Acts' (eds. P. Cole and J.L. Morgan) NY: Academic Press.

Leech, Geoffrey & Jan Svarticik. 1973. 'A Communicative Grammar of English', Singapore: ELBS & Longman.

Strang, Barbara M. 1969. 'Modern English Structure'. London : Edward Arnold.

■

मानव्यविद्या आणि सामाजिक विज्ञान विभाग,
आय.आय.टी., पवई, मुंबई 400 076.

## कमरखुलाई

भाषा आणि जीवन - एक प्रकारे अद्वैतच. जीवनात अनुभव नेमक्या शब्दात सांगण्याचे साधन. म्हणजे भाषा. फार नाही पण साधारण दिडशे वर्षांपूर्वीचे हिशेबाचे कागद वाचत असताना एका ठिकाणी 'कमरखुलाई रु. १०/- दिले' असा उल्लेख होता. वाटले की कमरदुखीवर औषध असावे. पण अर्थ असा होतो की त्या कमरखुलाईला आता भारदस्त शब्द सुचत नाही. पण व्यवहार मात्र तसाच चालू आहे.

शब्दकोशातील अर्थ असा - अपराधी कुळाकडे -- गुन्हेगारी कारणाकरिता आलेल्या शिपायास कंबर सोडावयास द्यावे लागणारे द्रव्य सरकारी शिपाई हा त्रास देऊन उकळून घेतो. एरव्ही गुन्हेगाराला देहधर्म इ.ही करून देत नाही. म्हणजे खुल्लमखुला व्यवहार होता. आता गुन्हेगार प्रतिष्ठित असतात. तेव्हा त्यांना सोडविण्याचे मार्ग तितकी प्रतिष्ठित असावे लागतात. त्याला कमरखुलाई कसे म्हणावे ? पण लगेच पुढचा खर्च होता. 'अंत्यस्त' रु. ५/- आता अंत्यस्त शब्दही भारदस्त. अर्थ - टेबलाखालून दिलेले पैसे. जीवनाचे प्रतिबिंब भाषेत पडते ते असे. भाष्याची आवश्यकता नाही.

– श्रीधर विश्वनाथ सहस्रबुद्धे, पुणे 411 030.

# ब्राह्मणी भाषा

ब्रह्मानंद देशपांडे

श्रीसमर्थ रामदासांनी 'ब्राह्मण हिंडता बरा' असे म्हटले आहे. त्यात किंचित बदल करून 'संशोधकू हिंडता बरा' असे म्हटले जाते. तेव्हा समाजात वावरतांना आणि संशोधनानिमित्त हिंडतांना काही शब्द खास ब्राह्मणी ठशाचे ध्यानात आले ते पुढे देत आहे :

**(१) पद्‌भ्याम्**

सायंकाळी गावाबाहेरच्या ग्रामदैवताच्या दर्शनाला जाण्याचा प्रघात असतो. श्रीसिद्धेश्वर हे आमचे ग्रामदैवत. मंदिराच्या प्रवेशद्वारासमोर दोन्ही बाजूला दोन प्रशस्त ओटे. या ओट्यांवर जेठा मारून बसलेला ब्रह्मवृंद. पितळी खलबत्त्यात पान आणि गप्पा कुटीत बसलेला. विषय होता गावात आलेल्या नव्या मुन्सरीमांचा. या शब्दाचा मूळ अर्थ व्यवस्थापक अथवा संचालक असा आहे. पण हा महसूल खात्यातील एक अधिकारी. इंग्रजी पदनाम रेव्हेन्यू इन्स्पेक्टर. मराठवाड्यातील निजामी अमदानीतील पदनाम गिर्दावर. तर नवीन आलेल्या या मुन्सरीम साहेबांविषयी सर्वांचेच चांगले मत होते. ते नि:स्पृह, कर्तव्यदक्ष आहेत असाच अवघ्या ब्रह्मवृंदाचा अभिप्राय आला. पण एक शास्त्रीबाबा शेंडीशी चाळा करीत म्हणाले, ''अहो ! अवघं खरं ! पण आहे तर शेवटी पद्‌भ्याम च कि नाही'' मला काही समजलं नाही. घरी परततांना वडिलांना विचारलं. ते महात्मा गांधींचे अनुयायी होते. ते म्हणाले, ''अरे ! ते नवे मुन्सरीम ब्राह्मण नाहीत. यांच्या नजरेनं ते खालच्या जातीतले. 'पद्‌भ्याम् शूद्रो अजायत' असे पुरुषसूक्तात आहे. त्याचा हा असा वापर.''

**(२) अनुष्टुभ्**

आमचे घराणे जळगाव जामोद (जिल्हा बुलढाणा) येथील जहागिरदारांचं. जहागिरी गेल्या पण शान मात्र गेली नाही. त्यामुळे उत्पन्न आणि खर्च यांचा मेळ बसायचा नाही. त्या दिवशी सायंकाळी वडील अंगणात बसून महिनाअखेरची खर्चाची जुळवाजुळव करीत असता मध्येच पुटपुटले, ''काय करावं ? सर्पण ही अनुष्टुपात

आलंय.'' मला इतकंच कळलं की सर्पण संपत आलंय. पुढे मग अर्थ ध्यानात आला. महाकाव्ये रचितांना प्रारंभी शार्दूलविक्रीडित, शिखरिणी, स्रग्धरा अशा भारदस्त वृत्तांचा वापर होतो. मग कवित्वशक्ती आटत येते. मग प्रत्येक चरणी अवघी आठ अक्षरे असलेल्या छोटेखानी अनुष्टुभ् वृत्तावर विसंबावे लागते. तेव्हा कमतरता येणे, संपत येणे या अर्थी अनुष्टुभात (अनुष्टुपात) येणे ही शब्दयोजना आली असावी.

श्री. य.न. केळकर संपादित 'ऐतिहासिक पोवाडे किंवा मराठ्यांचा काव्यमय इतिहास', भाग पहिला' (भारत इतिहास संशोधक मंडळ पुरस्कृत ग्रंथमाला, पुष्प ८, १९२८) यात शाहीर सुलताना पाटील याचा 'कंपूचा पोवाडा' छापला आहे (पृष्ठ ३४८-३५५). यात पाण्याचे दुर्भिक्ष्य वर्णिले आहे. त्यावर टीप देतांना श्री. केळकर यांनी 'आत दारुगोळीचा अभाव आहे. मुख्य मीठ नाही. पाणीही अनुष्टुप आहे. (खरे ७२७७)' हा संदर्भ दिला आहे. तेव्हा अनुष्टुभ् म्हणजेच संक्षिप्त वृत्त (शॉर्ट मीटर) यावरून अल्पता (शॉर्टेज) हा अर्थ निष्पन्न झाला असावा.

**(३) भाताचे देशपांडे - तुपाचे देशपांडे**

विदर्भाची जमीन काळीभोर. पंढरीचा बुक्काच. अतिशय सुपीक. त्यामुळे एकूण मंडळी आरामशीर. आळशी. त्यात जहागिरदार देशपांडे मंडळी तर अगदी पाठ खाजवायला माणूस ठेवणारी. आमचे आजोळ साखरखेर्डा (तालुका मेहकर, जिल्हा बुलढाणा) येथील. गाव जुनाट. ऐतिहासिक. दिल्लीचे मोगल आणि निजाम उल् मुल्क यांचे झुंज याच गावी झालेलं (सप्टेंबर ३०, १७२४ इ.स.) माझे मामा रामचंद्रराव देशपांडे हे औरंगाबादी माझ्या घरी आले. आमच्या घरची शिस्त आणि टापटीप पाहून म्हणाले, ''बरं झालं बुवा ! तुम्ही भाताचेही देशपांडे नाहीत आणि तुपाचेही देशपांडे नाहीत.'' ही आळस मोजण्याची परिमाणं. एकूण आळस असा की, घरधनिणीनं अवघा स्वयंपाक करून पानातले डावे उजवे वाढून भात वाढला की आंघोळीसाठी उठायचे. तो दुसरा भाऊ म्हणायचा, ''बसा हो दादासाहेब ! अजून तूप तर वाढायचंच आहे.'' असे भाताचे आणि तुपाचे देशपांडे. सुमारे दोन दशकांपूर्वी प्रकाशित झालेल्या एका ग्रंथात वऱ्हाडातील आळशी जहागिरदारासाठी घृतस्नायी आणि चरुस्नायी असे शब्द वाचल्याचे स्मरते.

**(४) संवत्सर**

श्रीसंत तुकडोजी महाराज नागपूर विश्वविद्यालयातील हस्तलिखित ग्रंथसंग्रहालयाचे सेवानिवृत्त अधिकारी डॉ. स.मो. अयाचित (आता सेवानिवृत्त) हे आमचे ज्येष्ठ स्नेही. औरंगाबादी आले की अगत्य ठेवून भेटीला येतात. औरंगाबादेत त्यांचे स्नेही 'संवत्सर' आडनावाचे आहेत. हे आडनाव वेगळे वाटले. साठ संवत्सरांचे एक चक्र असते. या








संवत्सरांची प्रभवविभवादि नावे असतात हे सर्वश्रुतच आहे. नाशिक जिल्ह्यात कोपरगावाजवळ संवत्सर नामक गाव आहे. संवत्सर आणि कुंकुमठाण ही गावे गोदावरीच्या उभय तीरावर समोरासमोर आहेत. संवत्सर गावी गोदावरीच्या पात्रात साठ गोल ओटे एका रांगेत आहेत. त्यांचा साठ संवत्सरांशी काय संबंध आहे ते कळत नाही. संवत्सर या ग्रामनामावरून संवत्सर हे आडनाव आले असावे काय ?

राजापूर येथील एका शिलाहार ताम्रपटाची नक्कल इतिहासाचार्य वि.का. राजवाडे यांना मिळाली होती. ती त्यांनी जशीच्या तशी छापली ('इतिहासाचार्य वि.का. राजवाडे समग्र साहित्य', खंड ४ था, पृ. १३०-१३५). हाच ताम्रपट वा.वि. मिराशी यांनीही छापला आहे ('शिलाहार राजवंशाचा इतिहास आणि कोरीव लेख', पृ. ३४२-३४८ आणि CII.,VI. pp.282-285). हा ताम्रपट शके ११९३, विरोधकृत संवत्सर, मार्गशीर्ष अमावस्या, सूर्यग्रहण, बुधवार (डिसेंबर १८, ११९१ इ.स.) या तिथीचा आहे. या ताम्रपटात राजाला 'सांवत्सर' असावा असे

*अप्रदीपा यथा रात्रिरनादित्यं यथा नभः*
*तथाऽ सांवत्सरो राजा भ्रमत्यंध इवाध्मनिः*

या श्लोकात म्हटले आहे. तेव्हा सांवत्सर म्हणजे तिथी, वार, नक्षत्र, करण आदि सांगणारा असा अर्थ संभवतो. तेव्हा सांवत्सर या वृत्तीचेच संवत्सर हे आडनाव झाले असावे.

**(५) उद्दालिका**

सासूबाईंचं सांगणं की शेगडी पेटवून पानगी भाज तर सुनबाईंनी चूल पेटवून भातपिठलं केलं. सासूबाई कडाडल्या, 'उद्दालिका मेली !'. उद्दालिका म्हणजे सांगितलं त्याच्या नेमके उलट करणारी. पुराणातील कथा अशी की उद्दालिका ही उद्दालक ऋषींची पत्नी. ती सांगितले त्याच्या नेमके उलट करायची. मग उद्दालक ऋषीच उलट सांगायचे. श्राद्धासाठी चोर, डाकू बोलाव. पितरांसाठी घुगऱ्या कर असं. उद्दालिकेनं श्राद्धासाठी ब्राह्मण आमंत्रित केले. पितरांसाठी पक्वान्ने रांधली. पण शेवटी उद्दालक म्हणाले, ''हे पिंड नदीच्या पात्रात टाक.'' तर उद्दालिकाने गटारात टाकले.

**(६) व्यतिपात आणि भद्रा**

दिवाळसणासाठी मोलकरणीला लुगडे दिले. ती कुरकुरत म्हणाली, ''बाईसाहेब पहा नं ! नव्या सुनबाईनं मले हलकं धडुतं देलं'' ती उठून गेल्यावर सासुबाईंचा पट्टा सुरू झाला, ''हे नवं सुनगट असंच. घरी व्यतिपात अन् माहेरी भद्रा ! सासरच्यांसाठी तिचा हात आखडते अन् माहेरच्यांसाठी मोकळा सोडते !''

व्यतिपात हा योग आहे. या योगावर कुठलेही शुभ कार्य करीत नाहीत. उलट भद्रा योगावर दानधर्म करतात. दानालाच भद्रा म्हणतात. दान देते समयी ज्या आसनावर बसायचे त्या आसनाला भद्रासन अथवा भद्रा म्हणतात. सारंग पंडित हे दान घेण्यासाठी कटक-देवगिरीला गेले तो महादेवराय यादवाची राणी वैजाई दान देण्यासाठी भद्रासनावर बसली होती. (''तवं मोटकी वैंजाराणी भद्रीं बैसली होती.'' लीळाचरित्र, संपा. वि.भि. कोलते, तिसरी आवृत्ती, पूर्वार्ध लीळा क्र. ११६)

**(७) हव्य-कव्य**

दादा चौधरी मोठा आढ्यताखोर. कर्मठ सनातनी. सोवळ्याओवळ्याचं मोठं अवडंबर. पण सूर्य ढळला. वैभव अवघं लोपलं. आणि दादाला मुसुलमान अंमलदाराच्या हाताखाली चपराशी व्हावं लागलं. आमचे वडील म्हणाले, ''काय राहिलं त्या अक्कडबाजाचं ? हव्य गेलं, कव्य गेलं अन् कमरेचं सोवळंही गेलं !'' कमरेचं सोवळे या ऐवजी ग्राम्य शब्दाचा वापर होता. हव्य म्हणजे यज्ञात देवांसाठी आहुती देण्याची सामग्री. कव्य म्हणजे पितरांना आहुती देण्याची सामग्री. अर्थात ज्याचे सर्वस्व नष्ट अशा अभाग्याचे हे वर्णन. यावरून हिंदीतील 'नारी मुई, संपत्ती नाशी, बिनमुंडाए भए संन्याशी' या म्हणीची आठवण येते.

**(८) शंकरशनि**

आमचे एक नातेवाईक परम संतापी होते. ते आमच्या परिवारात शंकरशनि म्हणून प्रख्यात होते. शंकर आणि शनिदेव यांचा हा मिश्रयोग काही केल्या लक्षात येईना. मग प्रकाश पडला की हे संकर्षण म्हणजेच बलराम आहेत. बलराम संतापी म्हणून प्रख्यात आहेतच.

**(९) इतर**

याशिवाय घृतकुल्या-मधुकुल्या (तुपाच्या आणि मधाच्या नद्या), सुखं च मे शयनं च मे (चैन विलासात राहणे) शंख (शंख अडणी शिवाय राहू शकत नाही तद्वत सदैव आसनाची - मानसन्मानाची - अपेक्षा ठेवणारा गृहस्थ) कडासन वळणे - होणे (रोड, दुर्बल अस्थिपंजर मात्र होणे), यजुर्वेदी ब्राह्मण मंत्र म्हणताना 'य'चा उच्चार 'ज' असा करतात म्हणून यजुर्वेद्यांना 'जज्जु' म्हणणे, 'महिपतराव गेला का तूप आनायले, आता झाली एक संवत्सर आणि एका प्रतिपदेची निचिंती' असा शेरा मारला जाणे असेही प्रयोग आहेत.

■

'ऐतिहासिक', १४, अनुपम वसाहत, श्रेयनगर, औरंगाबाद 431 005.
दूरध्वनी : (0240) 2336606

# वऱ्हाडी आणि अहिराणी बोलींतील समानार्थी म्हणी

**वासुदेव सोमाजी वले**

म्हणींची मौखिक परंपरा फार पूर्वीपासून चालत आलेली आहे. म्हणी जीवनाचा व्यापक अर्थ कमीत कमी शब्दांत व्यक्त करतात. सरोजिनी बाबर (१९७३, पृ. ६०) यांच्या मते, ''म्हणी म्हणजे काव्यखंड, लहानसेच पण चटकदार वचन, लघुता, व्यावहारिकता, चित्ताकर्षकता व लोकमान्यता हे म्हणीचे प्रमुख गुणविशेष होत.'' बहिणाबाई चौधरी (२०००, पृ. १०७) म्हणतात, ''म्हननारानं म्हन केली, जाननाराले अक्कल आली.'' अशा या म्हणींत समाजजीवनाचे, चालीरीती, रूढी, परंपरा यांचे प्रतिबिंब उमटलेले असते. ज्या बोलीत म्हण नाही अशी बोली आज सापडणे कठीण आहे. म्हणी एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे संक्रमित होतात. म्हणींत समाजाचे, लोकजीवनाचे भावना, विचार - विकार आणि संस्कृती - विकृतींचे दर्शन घडत असते. म्हणी ह्या काळाच्या ओघात नष्ट झालेले शब्द जतन करतात.

विदर्भात वऱ्हाडी आणि खानदेशात अहिराणी बोली प्रामुख्याने बोलली जाते. वऱ्हाड आणि खानदेश हे प्रदेश एकमेकांजवळ आहेत. लोकजीवनाच्या सार्वत्रिक अनुभवांचा आधार म्हणीला असल्यामुळे त्या जीवनाचे विशेष म्हणीतून व्यक्त होत असतात. म्हणूनच निरनिराळ्या लोकसमूहांत, प्रदेशांत, बोलींत एकाच अर्थाच्या म्हणी प्रचलित असलेल्या आढळतात. साधारणपणे त्या त्या समाजाची रचना, आचार-विचार, माणसांतील परस्परसंबंध, कुटुंबव्यवस्था, संस्कृती, नैतिक संकल्पना, देवदेवताविषयक कल्पना इत्यादींचे चित्रण म्हणींमध्ये आलेले दिसते.

विदर्भ आणि खानदेशचा भौगोलिक, ऐतिहासिक, सामाजिक व सांस्कृतिक परिवेश हा परस्परसंबंधातून जोपासला गेला आहे. तो संबंध त्यांच्या बोलींतूनही जाणवतो. या प्रदेशांच्या सीमा प्रदेशात मी राहात असल्यामुळे मला दोन्ही बोलींची माहिती आहे. त्यामुळे वऱ्हाडी आणि अहिराणीतील काही निवडक म्हणींचे बोलीरूप एकमेकांजवळ मांडून त्यांची चिकित्सा केली आहे. त्यासाठी वऱ्हाडीसाठी (व) आणि अहिराणीसाठी (अ) ही चिन्हे कंसात वापरली आहेत.








(१) घरची करते देवा देवा, बाहेरचीले चोयी शिवा (व)
घरची करस बुवा बुवा, बाहेरनीनं लुगडं धुवा (अ)

: घरच्या बाईपेक्षा दारच्या बाईची जास्त काळजी करणारा बाहेरख्याली पुरुष. त्याची लोकजीवनातली अप्रतिष्ठा व्यक्त करणारा हा विचार आहे.

(२) चाबऱ्या मानसाचे बाबरे होट, न पुसताच सांगे गोठ (व)
बाबऱ्या मानूसना चबऱ्या व्हट, बिन पुसानी सांगे गोट (अ)

: समाजात बडबड करणारे, कोणी त्यांना काहीही विचारले नाही तरी ते सर्व हकिकत सांगतात. ही मंडळी अविश्वासू असतात. त्यांची ही फाजील बडबड स्वभावानुसार चालते.

(३) मुंज्याले बायको नाही, वांझोटीले पोरं नाही (व)
सटवाईले नही नवरा, अन् म्हसोबाले नही बायको (अ)

: समाजातील दोन समदु:खी एकत्र आले की तिसरा सहज ही म्हण म्हणतो. हे उभयतां परस्परांच्या गरजा भागवितात. पर्याय नसल्याने एकत्र येतात. सटवाई आणि म्हसोबा या लोकदैवतांची स्थितीशीलता, लोकजीवनातील त्यांचे स्थान व मान यांचा संदर्भ या म्हणीतून व्यक्त होतो.

(४) बडेजाव मोठी, अन् बायकोच्या लुगड्याले गाठी (व)
घरमा नई दावा अन् म्हणे बाजीराव म्हना (अ)

: समाजात मोठा बडेजाव, पण प्रत्यक्षात मात्र दरिद्री असणे. पोकळ डामडौल दर्शविणे. आर्थिकदृष्ट्या दुर्बल असूनही खोट्या प्रतिष्ठेचा आव आणण्याच्या वृत्तीचा हा लोकनिषेध आहे.

(५) हड्याच्या सरापानं ढोरं मरत नाही (व)
हाड्याना शाप वरी गाय मरत नही (अ)

: निंदकाच्या बोलण्याने चांगल्या माणसाचे काहीच नुकसान होत नाही. दुर्बळ सबळांचे काही करू शकत नाही. दुर्जनांच्या खोट्या बोलण्यानं सज्जनांची दुरवस्था होत नाही.

(६) पाटलाला सर्व गाव भ्याये, पाटलीन मात्र अंगोठा दाये (व)
पाटीलले समदं गाव भ्यावे, अन् घरनी बायको अंगोठा दाये (अ)

: घरी पत्नी जुमानत नाही आणि बाहेर इतरांवर डोळे वटारून वर्चस्व गाजविणे. अशा विसंगत वृत्तीवरची ही लोकांची प्रतिक्रिया आहे.

(७) कामाला नाही जागा, हात नाही उगा (व)
काम नही कवडीनं, रिकामपन नही घडीनं (अ)
: काम काहीच करीत नाही पण फुरसत/सवड मात्र अजिबात नाही. खूप कामात असल्यासारखे दाखविणे; पण दाखवण्याइतपतही केलेले काम नसणे.

(८) कुनबी दिवायीले शहाना व्हतो (व)
कुनबी दिवायीले शाना व्हस (अ)
: कुणबी जातीचे लोक प्रामुख्याने शेती करतात. दिवाळीला शेतातील माल घरी येतो. तो कमी असतो. त्याला असे वाटते की या पिकाऐवजी दुसरे पीक घेतले/पेरले असते तर जास्त उत्पन्न मिळाले असते. वेळ निघून गेल्यावर शहाणपण सुचणे.

(९) भोयी भायी दिसते, घोयात वांगे खोसते (व)
भू बोलेना अन् वाट भूलेना (अ)
: शेतीप्रधान वऱ्हाडातील या म्हणीतून बाईच्या स्वभावाचे वर्णन होते. त्यावेळच्या स्त्रिया नऊवारी पातळ नेसत. घोळ पातळालाच असतो. दुसरे असे की, शेतात केवळ ज्वारी, गहू, बाजरी याशिवाय भाजीपालाही शेतकरी लावतात. तोडणीच्या वेळी मालकाचे लक्ष चुकवून लपवण्यासारख्या वस्तू काम करणाऱ्या बाया लुगड्याच्या घोळात टाकतात. बाह्यरूप वेगळे व आतले रूप वेगळे असणे अशा वृत्तीचा निषेध केला जातो.

(१०) खायच्या वक्ती आलो रे, धंद्याच्या वक्ती गेलो रे (व)
खावाले आधी आधी, कामाले कधीमधी (अ)
: खायला पुढे व कामाला मागे असणारा, माणसाच्या ऐतखाऊ वृत्तीचा निषेध करणारा हा विचार लोकजीवनात रूढ आहे.

(११) घरचा मया, भाजीची अवकया (व)
घरना चम्हार, आढाने फिरस (अ)
: शेतकरी भाजीपाल्याचे उत्पन्न काढतो. ते सर्व विकतो. स्वत:साठी काही नसते. तसेच स्वत: चांभार पण अनवाणी असणे. स्वत:च्या कष्टाचा फायदा स्वत:ला न मिळता इतरांनी त्याचा उपभोग घ्यावा अशी ही स्थिती.

(१२) भूक नस्सो पन शिदोरी अस्सो (व)
जानं झाय जेजूरी तं संगे लेवा शिदोरी (अ)
: दूरदृष्टीचा उत्कृष्ट नमुना. लोकजीवनातील हे व्यावहारिक ज्ञान आणि भविष्याचे तात्कालिक नियोजन करण्याची वृत्ती दर्शवणारी ही म्हण आहे.

(१३) तेली मारे धारोधार, खुदा मारे एक बार (व)
तेली देये भारोभार, खुदा देखे एक बार (अ)

: जेथे धंदा तेथे हस्तलाघव असतेच. तेली लोक देतांना थोडे हातचे राखून ठेवतो. तेल घेताना ग्राहकाचे होणारे नुकसान साधेसुधे सहन करण्यासारखे असते. परंतु आयुष्यात काही प्रसंग, घटना, नैसर्गिक आपत्ती इ. नुकसान असे असते की ज्याचा प्रतिकार करताना कंबरच मोडते. मानवी प्रवृत्ती चोरीच्या वृत्तीची, स्वार्थी असते. परंतु निसर्गशक्ती त्याला वेगळाच धडा शिकवीत असते.

(१४) आपन हासे लोकाले, शेंबुड आपल्या नाकाले (व)
नाव ठेये लोकाले, शेंबुड आपल्या नाकाले (अ)

: दुसऱ्याच्या सूक्ष्मातिसूक्ष्म चुकीचा गवगवा करणे आणि आपल्या घोडचुकीकडे मात्र दुर्लक्ष करणे. अशा मानभावी वृत्तीचा निषेध करणारी ही म्हण आहे.

(१५) पाचाची माय आन् खाटल्यावर जीव जाय (व)
बारास्नी माय अन् खाटल्यावर जीव जाय (अ)

: सगळे असून शेवटच्या तळमळीत थेंबभर पाणी द्यायला कोणीही जवळ नसणे. सामूहिक जबाबदारीच्या कामात कुणीच लक्ष घालत नाही, या संदर्भात लोकजीवनात रूढ झालेला हा विचार आहे.

(१६) म्हनलं मानकीले अन् लागलं चोंबडीले (व)
बोले धडाले, लागे कानोडाले (अ)

: एकाला म्हटले असता दुसऱ्याला ते म्हणणे लागणे. अहिराणीत त्याला 'कानोडा' म्हणतात.

(१७) डोंगर जये लोक पाह्यते, मन जये कोन पाह्यते (व)
डोंगर बयस तं जग देखसं, मन बयस तं कोन्हीनही देखत (अ)

: डोंगर जळतो तर संपूर्ण जग पाहते पण मन जळते तर कुणीही पाहत नाही. अंतःकरणातील दुःखाची झळ ज्याची त्यालाच सोसावी लागते.

(१८) पदरी पडलं झड, हासुन करावं गोड (व)
पदरम्हा पडनं खोड, हासीसन करवा गोड (अ)

: जे पदरात पडले आहे. त्यात समाधान मानून सुखाने जगावे. दुर्दैवालासुद्धा आनंदाने सामोरे जावे. प्राप्तपरिस्थितीशी जुळवून घेण्याशिवाय पर्याय नसतो.

(१९) अडकाले ना धडकाले, लाथ मारली खडकाले (ब)
चावडीवर बसना नीट, घरमा नही तीखट मीठ (अ)
: असण्यापेक्षा दाखविणे जास्त अशा वृत्तीचा हा निषेध आहे.

(२०) आला चेवं तं केला देव, नाही तं हरहर महादेव (व)
मनम्हा उनं तं काशी, नही तं जशींतशी (अ)
: अनियमित काम करणारे, धरसोड वृत्ती असणारे, अतिउत्साहीपणामुळे म्हणाल तर खूप काम करायचे नाहीतर आळशीच राहायचे.

(२१) आंगाले आला ताप तं देव माहा बाप (व)
आंगम्हा उना ताप तवं देव मना बाप (अ)
: फक्त दु:खात, संकटात असताना देवाचे नामस्मरण करणारा. स्वार्थीवृत्ती, तात्कालिक विचार करण्याची प्रवृत्तीदर्शक ही म्हण आहे.

(२२) धरा धरा मले, मी चाल्ली जीव द्याले (व)
झवाडू का भ्यावाडू (अ)
: घरात भांडण झाले की बायकांचे ठरलेले असते. माहेरी जाईन किंवा जीव देईन. उगीच भीती दाखवून आपलं वर्चस्व स्थापन करण्याचा आक्रस्ताळेपणा या म्हणीतून व्यक्त होतो.

(२३) तेल ना कांदा, सांगा कसं नांदा (व)
घरमा नही गहू, कसी मी राहू (अ)
: आपल्याला येत नाही पाहून दुसऱ्याला दोष देणे. स्वत:च्या चुकीचा दोष दुसऱ्याच्या माथी मारण्याची ही कामचुकार व स्वार्थी वृत्ती दिसून येते.

(२४) माय तशी बेटी, गहू तशी रोटी (व)
बाप तसा बेटा, कुमार तसा लोटा (अ)
: 'खाण तशी माती' या अर्थाची ही म्हण आहे.

(२५) साधूची लागावं लाथ, पन भोंदूचा लागू नये हात (व)
शानाना चुल्हा फुको, मतलबीनं दर्सन नको (अ)
: शहाण्याचा नोकर होणं चांगलं; पण मूर्खाचा मालक होऊ नये. सज्जनांची संगत करावी पण दुर्जनाची सावलीही नको अशी ही म्हण आहे.

(२६) अडान्याच्या गायी देव झोपेत पाही (व)
अडानीना देव वाली (अ)

: ग्रामीण जीवनातील अज्ञानी/अडाणी लोकांचा देवावरचा विश्वास, दैवावर भरोसा ठेवण्याची ही वृत्ती आहे.

(२७) हातानं उपटेना मुळा, तोंड करे चाळा (व)
हातपाय काडी, तोंडम्हा बडबडी (अ)

: वायफळ बडबडीने किंवा फुशारकीने कोणतेच काम जमत नाही. अशक्त माणूस कामापेक्षा वाचाळ बडबड करतो. त्याच्या वृत्तीचा हा निषेध आहे.

(२८) म्हना का बोला, पोटाले घाला (व)
काहीबी कर, पन पोट भर (अ)

: काहीही बोला पण पोटभर जेवण द्या. स्वाभिमानशून्यतादर्शक ही म्हण आहे.

(२९) हटेल कुत्रं, देवावर मुत्रं (व)
झिपरं कुत्रं, देवावर मुत्रं (अ)

: मूळ स्वभावाला औषध नाही हे सर्वमान्यच आहे. आढ्यतेखोरवृत्तीचा माणूस विधिनिषेध पाळत नाही. त्याची वृत्ती दर्शविणारी ही म्हण आहे.

(३०) आधी पुजले खोडखांड, मग बसली देवापुढं (व) करता करता भागले,
झवाडी झवाडी भागनी, अन् देव पुजाले लागनी (अ) देवपूजेला लागले.

: आयुष्यभर कुकर्म करून कंटाळा आल्यावर सत्कर्माकडे वळणे. जाणीवपूर्वक चुका करून कुकर्म करीत राहिल्यावर उत्तर आयुष्यात सत्कर्माचा आव आणणारे लोक समाजात असतात.

(३१) माय येली, बाप तेली, पोरगं निघालं सैय्यद अली (व)
माय पिंजारा अन् बाप टकारा (अ)

: घरात कोणाचा पायपोस कोणाच्या पायात नसणे. आंतरजातीय विवाह करणाऱ्या दांपत्याची मुले बिघडली तर ही म्हण म्हटली जाते. सांस्कृतिक दृष्टीने विधिनिषेध न पाळता, येणाऱ्या फळांची नीटपणे काळजी न घेता केलेले नीतिनियम विरुद्ध कृत्य दर्शविणारी ही म्हण आहे.

(३२) नाव अन्नपूर्णाबाई, दवळीत भाकर नाही (व)

गावना म्हाजन, घरमा रिकामा रांझन (अ)

: 'नाव मोठं पण लक्षण खोटं' या अर्थाची म्हण. नावापेक्षा त्याच्या कर्मानं माणूस श्रेष्ठ ठरतो, या अर्थाचा प्रचार करणारा हा विचार.

**टीप :**

प्रस्तुत निबंधात घेतलेल्या अहिराणी म्हणी ह्या 'अहिराणी-म्हणी-वाक्प्रचार'- डॉ. रमेश सूर्यवंशी, अक्षय प्रकाशन, पुणे या पुस्तकातून तसेच माझे मित्र श्री. साहेबराव श्रीपत पाटील (पाचोरा), श्री. कैलास पाटील (लासुरे, ता. पाचोरा) विद्यार्थी योगेश पाटील, यशवंत पाटील (खडकदेवळा, ता. पाचोरा) यांचेकडून घेतलेल्या आहेत आणि वऱ्हाडी म्हणी ह्या 'वऱ्हाडी बोलीतील लोकसाहित्य : स्वरूप आणि समीक्षा' – डॉ. लता लांजेवार, विजय प्रकाशन, नागपूर या पुस्तकातून तसेच श्री. सोपान वले (दसरखेड, ता. मलकापूर), श्री. ज्ञानदेव वले (घुसर, ता. मोताळा, जि. बुलडाणा) यांच्याकडून घेतलेल्या आहेत.

--------

**संदर्भ :**

चौधरी, बहिणाबाई २००० (६ वी आवृत्ती) 'बहिणाबाईची गाणी', सुचित्रा प्रकाशन, मुंबई.

बाबर, सरोजिनी १९७३ 'महाराष्ट्र : मराठी संस्कृती व साहित्य'. भारतीय लोकसंस्कृती व साहित्य माला. महाराष्ट्र लोक साहित्य समिती, पुणे. ■

श्री शेठ मु. मा. महाविद्यालय

पाचोरा, (जि. जळगाव) दूरध्वनी 02596 - 244990

(२६) अडान्याच्या गायी देव झोपेत पाही (व)
अडानीना देव वाली (अ)

: ग्रामीण जीवनातील अज्ञानी/अडाणी लोकांचा देवावरचा विश्वास, दैवावर भरोसा ठेवण्याची ही वृत्ती आहे.

(२७) हातानं उपटेना मुळा, तोंड करे चाळा (व)
हातपाय काडी, तोंडम्हा बडबडी (अ)

: वायफळ बडबडीने किंवा फुशारकीने कोणतेच काम जमत नाही. अशक्त माणूस कामापेक्षा वाचाळ बडबड करतो. त्याच्या वृत्तीचा हा निषेध आहे.

(२८) म्हना का बोला, पोटाले घाला (व)
काहीबी कर, पन पोट भर (अ)

: काहीही बोला पण पोटभर जेवण द्या. स्वाभिमानशून्यतादर्शक ही म्हण आहे.

(२९) हटेल कुत्रं, देवावर मुत्रं (व)
झिपरं कुत्रं, देवावर मुत्रं (अ)

: मूळ स्वभावाला औषध नाही हे सर्वमान्यच आहे. आढ्यतेखोरवृत्तीचा माणूस विधिनिषेध पाळत नाही. त्याची वृत्ती दर्शविणारी ही म्हण आहे.

(३०) आधी पुजले खोडखांड, मग बसली देवापुढं (व) करता करता भागले,
झवाडी झवाडी भागनी, अन् देव पुजाले लागनी (अ) देवपूजेला लागले.

: आयुष्यभर कुकर्म करून कंटाळा आल्यावर सत्कर्माकडे वळणे. जाणीवपूर्वक चुका करून कुकर्म करीत राहिल्यावर उत्तर आयुष्यात सत्कर्माचा आव आणणारे लोक समाजात असतात.

(३१) माय येली, बाप तेली, पोरगं निघालं सैय्यद अली (व)
माय पिंजारा अन् बाप टकारा (अ)

: घरात कोणाचा पायपोस कोणाच्या पायात नसणे. आंतरजातीय विवाह करणाऱ्या दांपत्याची मुले बिघडली तर ही म्हण म्हटली जाते. सांस्कृतिक दृष्टीने विधिनिषेध न पाळता, येणाऱ्या फळांची नीटपणे काळजी न घेता केलेले नीतिनियम विरुद्ध कृत्य दर्शविणारी ही म्हण आहे.

(३२) नाव अन्नपूर्णाबाई, दवळीत भाकर नाही (व)

गावना म्हाजन, घरमा रिकामा रांझन (अ)

: 'नाव मोठं पण लक्षण खोटं' या अर्थाची म्हण. नावापेक्षा त्याच्या कर्मानं माणूस श्रेष्ठ ठरतो, या अर्थाचा प्रचार करणारा हा विचार.

**टीप :**

प्रस्तुत निबंधात घेतलेल्या अहिराणी म्हणी ह्या 'अहिराणी-म्हणी-वाक्प्रचार'- डॉ. रमेश सूर्यवंशी, अक्षय प्रकाशन, पुणे या पुस्तकातून तसेच माझे मित्र श्री. साहेबराव श्रीपत पाटील (पाचोरा), श्री. कैलास पाटील (लासुरे, ता. पाचोरा) विद्यार्थी योगेश पाटील, यशवंत पाटील (खडकदेवळा, ता. पाचोरा) यांचेकडून घेतलेल्या आहेत आणि वऱ्हाडी म्हणी ह्या 'वऱ्हाडी बोलीतील लोकसाहित्य : स्वरूप आणि समीक्षा' – डॉ. लता लांजेवार, विजय प्रकाशन, नागपूर या पुस्तकातून तसेच श्री. सोपान वले (दसरखेड, ता. मलकापूर), श्री. ज्ञानदेव वले (घुसर, ता. मोताळा, जि. बुलडाणा) यांच्याकडून घेतलेल्या आहेत.

--------

**संदर्भ :**

चौधरी, बहिणाबाई २००० (६ वी आवृत्ती) 'बहिणाबाईची गाणी', सुचित्रा प्रकाशन, मुंबई.

बाबर, सरोजिनी १९७३ 'महाराष्ट्र : मराठी संस्कृती व साहित्य'. भारतीय लोकसंस्कृती व साहित्य माला. महाराष्ट्र लोक साहित्य समिती, पुणे. ■

श्री शेठ मु. मा. महाविद्यालय
पाचोरा, (जि. जळगाव) दूरध्वनी 02596 - 244990





अनुक्रमणिका






ज्याची त्याची प्रचीती

# तेलुगु-मराठी शब्दयोजन

माणिक धनपलवार

प्रत्येक भाषेची काही एक विशिष्ट प्रकृती असते. काही विशिष्ट वाक्प्रयोग असतात. तत्सम शब्दांचे अर्थ व भावही त्यात अनेक वेळा बदललेले दिसतात. मराठीपेक्षा वेगळ्या वाटणाऱ्या तेलुगूतील शब्दांच्या अर्थच्छटांचा विचार करून पुढील उतारा सिद्ध केला आहे. उताऱ्यातील काही अधोरेखित शब्द हे तत्सम आहेत तर अन्य अधोरेखित शब्द हे त्या त्या ठिकाणी उपयोजिल्या जाणाऱ्या तेलुगु शब्दांचे अनुवाद होत. मराठी वर्तमानपत्रात त्या जागी प्राय: कोणते शब्द येतात, हे कंसांत दर्शविले आहे.

काही दिवसांपासून असलेली कल्लोलित (अशांत) परिस्थिती आता बरीच शांत झाली. कर्फ्यू उचलून फेकून दिल्यावर (उठवल्यावर) एकही अवांछनीय (अप्रिय) संघटना (घटना) घडली नाही. कर्फ्यूच्या काळात काही लोकांनी आवेशाने (रागाने) घरे व दुकाने जाळली. अशा दौर्जन्य (गुंडगिरी) करणाऱ्या लोकांना शासन कडक शिक्षा करील, असे मुख्यमंत्री एका बहिरंग सभेत (जाहीर सभेत) म्हणाले. दोन्ही जमातींच्या एका समावेशात (बैठकीत) प्रत्येक धर्मियास आपापल्या संप्रदायाप्रमाणे (परंपरेप्रमाणे) वागण्याचा हक्क आहे असे प्रतिपादिले, व भद्रंगा (शांततेने) राहण्याचे आवाहन केले. जातीय (राष्ट्रीय) ऐक्याच्या गोष्टी आपण बोलतो पण कुलवाद (जातीयता) आपल्या समाजातून अजून गेला नाही. तिकडे तिकडे (कुठे कुठे), तेव्हा तेव्हा (कधी कधी) अशा घटना घडणे वेगळे, पण आता तो नित्याचाच भाग होऊन बसला आहे. भारताचे चरित्र (इतिहास) अशाच घटनांनी भरलेले आहे. एखाद्या प्रमादाने (अपघाताने) माणसे दगावणे वेगळे व आपणच आपणांस मारणे वेगळे. यावर उपाय म्हणजे निम्नस्तरीय लोकांची आर्थिक सुधारणा व्हायला हवी असे काही वक्त्यांनी एका संतापसभेत (शोकसभेत) सांगितले. काही वक्त्यांनी मोठ्या कारखान्यांचे जातीयीकरण (राष्ट्रीयीकरण) करावे असे सुचविले. मुख्य म्हणजे निरुद्योगी (बेकार) लोकांना काम मिळावे. शांतता निर्माण करणाऱ्या लोकांना बहुमति (बक्षीस) द्यावी, असेही एकाने सुचविले. कर्फ्यूमुळे कामकाज स्तंभित (ठप्प) होते,

हे समाजाच्या दृष्टीने बरे नव्हे. परिस्थिती तृप्तिकारक (समाधानकारक) झाल्यास कर्फ्यू लावण्याचा अवसर (आवश्यकता) येणार नाही, हेही खरे. शासनाने दंगलपीडित लोकांना उचितरीतीने (विनामूल्य) धान्य देण्याची व्यवस्था मात्र केली पाहिजे, व अन्य सदुपायही (सोयीही) पुरवावेत, स्वच्छंद संस्था (स्वायत्तसंस्था) यांनीही याबाबतीत थोडा भार उचलला पाहिजे. आता अंकितभावाने (समर्पित वृत्तीने) काम करणारी माणसेच दुर्मीळ झाली आहेत. दुरभिप्रायातून (गैरसमजातून) अनेकदा कलह निर्माण होतात, ते टाळले पाहिजे, म्हणजे प्रदेशाची सर्व रंगांत (क्षेत्रांत) प्रगती व्हावयास वेळ लागणार नाही. या भूमिकेस कुणाचेही अभ्यंतर (आक्षेप) राहणार नाही, अशी अपेक्षा आहे.

■

३-४-१०१३/१९, बरकतपुरा, हैदराबाद 500 027.

## अनिष्ट शब्दप्रयोग

'गांधीगिरी' हा एक दुष्ट प्रयोग आहे. गांधीजींनी अनुसरलेला मार्ग हा अर्थ व्यक्त करण्यासाठी गांधीमार्ग, गांधीविचार असे शब्द उपलब्ध आहेत. गांधीगिरी हा शब्द उपयोगात येऊ लागला तेव्हा त्यालाही भीती वाटत असावी. कारण तेव्हा तो संरक्षणासाठी अवतरण चिन्हांची दोन कुंडले दोन बाजूस धारण करून 'गांधीगिरी' अशा स्वरूपात दिसत असे. निर्ढावल्यामुळे अलीकडे त्याने ती संरक्षक कुंडले काढून ठेवली आहेत. मराठीत 'गिरी'सारखाच 'खोर' हा प्रत्यय अपप्रवृत्ती दर्शविण्यासाठी उपयोगात येतो. जसे दिवाळखोर, हल्लेखोर, चहाडखोर इत्यादी. एखाद्या गुंडाला आपण 'हिंसेखोर' म्हणू; पण गांधीजी 'अहिंसेखोर' होते असे आपण कदापि म्हणणार नाही; तसेच 'गांधीगिरी' हा शब्दप्रयोग न करणेच इष्ट आहे. या शब्दप्रयोगाला गांधीवादी, समाजवादी ज्येष्ठ कार्यकर्त्यांनी तसेच मराठीच्या अभ्यासकांनी आक्षेप घेतला तर त्याचा इष्ट तो परिणाम घडून आलेला दिसेल. 'गांधीगिरी क्लब' ऐवजी 'गांधी विचार मंच' असे प्रयोग रूढ व्हावेत म्हणून वेळीच प्रयत्न व्हायला हवेत.

— म.अ. मेहेंदळे, दै. सकाळ, ३१-१०-२००६, पुणे.

दस्वलपात्र

# तुम्हीच सांगा

मंगला गोडबोले

'फुल टू धमाल म्हणजे काय ?' 'रेडिओ मिरची' हे काय प्रकरण आहे ? मग 'टी.व्ही. कोथिंबीर' का नसावी ? मी तुझी मदत करतो, तू माझी मदत कर, हे काय आहे ? मदत 'माझी' करतात का 'मला' करतात ? नारळ खववणे म्हणजे काय ? रताळ्याचा खीस कुठला ? आलं-लसणाची पेस्ट कशी बनते ? त्याच्या मागची पार्श्वभूमी समजून घ्या, म्हणजे नक्की काय समजून घ्यायचं ? 'मानसिकता' हे काय लफडं आहे ? आधीच मन, पुढे मानस, पुढे 'इक' प्रत्यय लागून मानसिक, पुढे निष्कारण मानसिकता, आता त्याहीपुढे 'मानसिकताई' म्हणायला लागायचं का ? सुतकताईसारखं ? याच्ना, रच्ना, भाव्ना, अंज्ली, द्रॉप्दी, मंग्ला ही कुठली नावं ? अमक्यातमक्याचा एम.ए. 'करायचा' विचार आहे म्हणतात. एम.ए. करणार म्हणजे तो पठ्ठ्या नक्की काय करणार ? पोरांना शाळेत घालतात की टाकतात ? 'जेवण बनवलं का ?' हा काय प्रश्न आहे ? 'स्वयंपाक केला का' असं म्हणता येणार नाही का ? साडी घालतात का ? स्वेटर शिवतात का ? झाडू लावतात का ? 'जेवण लावलंय' म्हणजे 'खाना लगाया है' असंच ना ? 'पुढे जाऊन ते वक्ते म्हणाले...' ही काय कृती आहे ? कशाच्या पुढे जाऊन ? फार पुढे गेले तर स्टेजवरून पडतील ना बिचारे.. 'आगे चलके उन्होंने कहा' असं हिंदीत असतं, म्हणून आपणही पुढे जाऊन बोलायचं ? 'तू जाऊ शकशील का ?', 'तू करू शकला असतास', हा 'शक्य' क्रियापदाचा धुडगूस का ? इंग्रजीत 'कॅन-कुड' असतं म्हणून ?

बघावं तो कार्यक्रम बेटा 'संपन्न' कसा होतो ? आणि त्या ठिकाणी एखादी मरतुकडी समई शंभरदा काड्या ओढत, कशीबशी लावली की झालं 'दीपप्रज्वलन'! कसलं ज्वलंत वाटतं ना ? आज आमच्या घरी 'पूजा' आहे, यात वेगळं काय सांगायचं ? बऱ्याच घरांमध्ये दररोज पूजा करतात. ही सत्यनारायणाची महापूजा तर नव्हे ? 'द पूजा ?' प्रसाद आणि नैवेद्य यात काय फरक ? आरती उतरवतात का ? प्रसाद चढवतात का ? मृतात्म्याची शांती का इच्छायची ? व्यक्ती मृत का आत्मा

मृत ? बहुधा भाषाच मृतप्राय !

आपल्या भाषेचं हल्ली हे असं होत असतं. हिंदी म्हणू नका, इंग्रजी म्हणू नका, चहू बाजूंनी सर्व प्रकारची भेसळ, मिसळामिसळ सुरू असते. अस्सल रुपडं कुठं काही दिसतच नाही. कुठूनतरी संवाद साधला म्हणजे झालं, 'कम्युनिकेशन इज द की' असं बोलून सर्वांवर पांघरूण घातलं जातं. एका मर्यादेपर्यंत पत्करावंही लागतं; पण हाच संवाद कानामनाला जास्त सुखदायी असा करता येणार नाही का ? नुसती धान्यं किंवा पालापाचोळा खाऊनही पोट भरू शकेल. तरीही आपण रुचकर, चटकमटक पदार्थ बनवून पोट भरतोच ना ? मग गरीब बिचारी भाषा तेवढी कायम संवादाच्या प्राथमिक पातळीवरच ठेवायची का ? आणि तिचं रुक्ष, खडबडीत, आकारविकारविहीन रूपच स्वीकारायचं का ? अर्थांच्या सूक्ष्म छटा गमावलेल्या, नादलयाविरहित, व्यक्तिमत्त्वशून्य भाषेबरोबर जगावं लागणं, ही सध्याची मोठी आपत्ती आहे आणि ही आपत्ती आहे, हेच अनेकांना कळत नाही, ही त्याहून मोठी खंत आहे. अशा विपन्न भाषेबरोबर आयुष्य संपन्न कसं करायचं, तुम्ही सांगा. ■

दै. सकाळ, २७-५-०५

---

**निवेदन**

## महाविद्यालय वार्षिक अंक स्पर्धा : २००५-२००६

मराठी अभ्यास परिषदेच्या रौप्यमहोत्सवानिमित्त विद्यार्थ्यांच्या लेखनगुणांना उत्तेजन देण्यासाठी 'महाविद्यालयांच्या वार्षिक अंकांची स्पर्धा' आयोजित करण्यात येत आहे. २००५-२००६ या वर्षाचे अंक स्पर्धेसाठी विचारात घेतले जातील. यशस्वी वार्षिक अंकांना रु. ५०००/-, रु. ३०००/- व रु. २०००/- अशी पारितोषिके दिली जातील. तसेच लेखक-विद्यार्थ्यांच्या मराठीतील कथा, कविता, ललितगद्य इत्यादी लेखनासाठीही खास बक्षिसे असतील. स्पर्धेसाठी महाविद्यालयाने आपला वार्षिक अंक ३१ जानेवारी २००७ पूर्वी पाठवावा. सोबत प्रवेशशुल्क रु. ५०/- (बँकदेयक 'मराठी अभ्यास परिषद' नावे) पाठवावे.

**: पत्रव्यवहारासाठी पत्ता :**

नीलिमा गुंडी, कार्यवाह, 'मराठी अभ्यास परिषद'
३, 'अन्नपूर्णा,' १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर, गल्ली क्र. ५,
वाडिया रुग्णालयासमोर, पुणे ४११ ००२.
दूरध्वनी क्र. (०२०) २४४८६०१५

---





अनुक्रमणिका

# माझा वन बीएचके फ्लॅट

वि.आ. बुवा

मी शंभर टक्के मराठी आहे. पण माझा फ्लॅट – तो मात्र जवळ जवळ शंभर टक्के इंग्लिशाळले आहे. अरब आणि उंट या कथेमधल्या उंटाप्रमाणे इंग्लिशच्या उंटानं 'मराठी अरबा'ला फ्लॅटच्या घराबाहेर काढलं आहे. शेगडी, चूल जाऊन गॅस आला. गॅस म्हटलं की सिलिंडर आले. पेटवायला लायटर पाठोपाठ तयार. उजेडासाठी ट्यूब, बल्ब, नाइट लॅम्प, बंद-सुरूसाठी ऑफ-ऑन, ट्यूबची नातेवाईक मंडळी चोक, स्टार्टर, वायर, स्विच. ही नातेवाईक मंडळी एकजात इंग्लिश. स्वयंपाकघर इंग्रजांच्या काळात होतं. आता 'किचन' हा सोपा 'मराठी' शब्द रूढ झाला आहे. न्हाणीघर, संडास, शी:! टॉयलेट-बाथरूम म्हटलं की कसं चकाचक वाटतं. तिथंही कॉक, शॉवर, बाथ, ड्रम, बेसिन, सोप, सोप-केस, डिटर्जंट पावडर, रॉड, हूक, टब, टॉवेल, बकेट, ट्यूब आहे. आमच्या हॉलमध्ये टेबल, टी-पॉय, स्टँड, रॅक, वॉलक्लॉक, टेलिफोन डिरेक्टरी, फॅन, सोफासेट, कर्टन्स, शो-केस, स्टील कबर्ड, वॉर्डरोब, हँगर, शर्ट, बुश-शर्ट, पँट, अंडरवेअर, पेन, बॉलपेन, पेन्सिल, इरेझर, पंचिंग मशीन, स्टेपलर, क्लिप्स, पिन्स, सेफ्टी पिन्स, पेपर, कार्बन पेपर, फाइल, फेविकॉल, रबरबँड, टेप, स्टँप्स, स्टिकर, मॅगेझिन, डेली पेपर, फोटो, स्क्रू, सेलोफोन, टेप, पेन्सिल शार्पनर, कटर, ट्रे आणि आणखी काही नाही. तिथून मुक्काम-पोस्ट झोपायची खोली. इंग्रज होते तोपर्यंत ही खोली झोपायचीच खोली होती. पण स्वातंत्र्य मिळाल्यानंतर ती बेडरूम झाली. तिथंही कॉट, ब्लँकेट, बेडशिट, रग, नाइटलॅम्प, नायसिल पावडर वगैरे वगैरे इंग्लिश शब्दांनी 'हाऊस-फुल्ललेला' आमचा फ्लॅट आहे. मायबोली हा शब्दसुद्धा ५० टक्के इंग्रजाळलेला असतो – असा : MY बोली. तरीही मी मराठी माणूस आहे असं माझी तीस-बत्तीस इंची छाती फुगवून सांगतो. दारालासुद्धा कॉलबेल, लॅच, हँडल, बोल्ट, लेटर बॉक्स एवढी इंग्लिश मंडळी लटकलेली असतात. आमच्या फ्लॅटचा टोटल एरिया ६५०/- रुपये स्क्वेअर फूट या रेटने पडला. फ्लॅट फर्स्ट फ्लोअरवर आहे.

आता सांगितलेल्या लिस्टात आणखी काही वस्तूंची भर घालतो. रेझर, ब्लेड,





अनुक्रमणिका

सेव्हिंग क्रीम, ब्रश, टूथपेस्ट, टूथब्रश, व्हॅसलिन, नेलपेंट, लिपस्टिक, फेस पावडर, हेअर ऑईल, नॅपकीन, कार्ड, लेटरबॉक्स, ग्लास, ब्राऊन पेपर, ड्रॉइंग पेपर, व्हिजिटिंग कार्ड, पास, बिल, कॅश-मेमो, टाइल्स, व्हेंटिलेटर, एक्झॉस्ट फॅन, हूक बॉक्स, पॅकेट, ब्रेड, सँडविच, जॅम, बटर, प्लेट, बाउल, टोस्ट, टाइमटेबल, वॉटर बॅग, रेशन कार्ड, मिक्सर, टीव्ही, रेडिओ, मोबाईल फोन, क्रीम, हँगर, ब्लाउज, पेटिकोट, स्कर्ट, टीशर्ट, फ्रॉक, गाउन – तोबा ! तोबा ! तोबा ! डबा पालथा केल्यावर आतील पदार्थ भसाभसा खाली पडतात, त्याच चालीवर ६५० चौरस फुटांच्या फ्लॅटमध्ये इंग्लिश डिक्शनरी पालथी केली गेली आहे. स्वतः इंग्लिश 'डिक्शनरी काकूंनीच' हे सत्कार्य केल्यामुळे एवढे प्रचंड इंग्लिश शब्दभांडार आमच्या फ्लॅटमध्ये सुखेनैव नांदते आहे.

■

दै. सकाळ, दिवाळी २२.१०.०६

---

प्रतिसाद

# मॅलप्रॉपिजम आणि 'वक्रतुंडी' भाषा

राजीव नाईक

'भाषा आणि जीवन'च्या दिवाळी २००६च्या अंकात 'सदोष पण उपयुक्त परिभाषा-कोश' हा श्रीमती माधवी आपटे ह्यांचा परीक्षणलेख आला आहे. त्यात 'मॅलप्रॉपिजम' ह्या शब्दाला सुचवलेल्या 'वक्रतुंडी भाषित' ह्या शब्दाला त्या आक्षेप घेतात. हा शब्द कळायला अवघड जाऊ नये. कारण श्रीमती मॅलप्रॉपचा जवळचा नातेवाईक ठरावा असाच 'खडाष्टक'मधला वक्रतुंड आहे. 'इथून लांब निघून जातो' ऐवजी 'इथून लंबायमान होतो कसा' छापाचं बोलणारा. इंग्रजी बोलणाऱ्यांमधे श्रीमती मॅलप्रॉप जितक्या टक्के लोकांना माहीत आहे; साधारण तेवढ्याच टक्के मराठी बोलणाऱ्यांना हा वक्रतुंड ठाऊक असावा. वक्रतुंड म्हटलं, की आपल्याला गणपती आठवतो हा मात्र वांधा आहे. ■

३५, कलानगर, वांद्रे (पूर्व), मुंबई 400 051. दूरध्वनी 26590744 / 26592641

---








दखलपात्र

# भाषेची शृंगापत्ती

मंजिरी धोडपकर
अनुवाद – सुप्रिया सहस्रबुद्धे

लहान असताना, शाळेत इंग्रजी का आहे असा प्रश्न मला नेहमी पडत असे. 'परकीय भाषा' असे आम्हाला सांगितले जात असे. त्यामुळे मनात आणखी गोंधळ होत असे, कारण आजूबाजूला कोणी परदेशी लोक नव्हते. लवकरच आम्हाला कळून आले, की बहुभाषिक देशाची एक सर्वांत विचित्र समस्या भाषा हीच असते, विशेषत: ज्या भाषेत तुम्ही अभ्यास करता ती भाषा.

मी विद्यार्थी असताना शाळा दोन प्रकारच्या असायच्या. शिक्षणाचे माध्यम मातृभाषा असावी यावर भर देणाऱ्या शाळांचे वर्चस्व होते. या शाळा विद्यार्थ्यांमध्ये आपल्या प्रांताबद्दल अतिरिक्त अभिमान निर्माण करायच्या. तितकाच मोठा अभिमान जर देशाबद्दलही निर्माण करायला त्या विसरल्या नसत्या, तर त्यामुळे काही नुकसान झाले नसते. अनेक वेळा विद्यार्थ्यांना इतर प्रांतांच्या सद्गुणांबद्दल अंधारात ठेवले जात असे.

अशा शाळांत सुज्ञपणाच्या दृष्टिकोणातून इंग्रजी शिकवले जात असे. पूर्णपणे कंटाळवाणा व्हावा असा अभ्यासक्रम काळजीपूर्वक निवडला जात असे. चुकून एखादा मजेदार धडा आलाच तर तो जास्तीत जास्त शब्दांचे व्याकरण चालवण्यासाठी वापरला जात असे. तेव्हा आर.के. नारायणांचा 'स्वामी' म्हणजे ''तृतीय पुरुषी एकवचनी पुंलिंगी विशेषनाम, 'वाट पहात होता' या क्रियापदाचा 'कर्ता' होता. लवकरच सगळा वर्ग उभा करून ठेवला जात असे – 'प्लेइंग क्रिकेट' सकर्मक की अकर्मक हे न सांगता आल्याबद्दल ही शिक्षा असे. क्रियाविशेषणे आणि भूतकालवाचक धातुसाधिते यांच्या व्याख्यांच्या भरपूर ज्ञानानंतर त्यांचा वापर करायला मात्र आम्हाला परवानगी दिली जात नसे. इंग्रजीत संभाषण करणे अशक्य असे कारण इतर सर्व कार्यक्रम मातृभाषेतून होत. अशा रीतीने पंधरा वर्षे इंग्रजीचा अभ्यास केल्यानंतर इंग्रजी ही आमच्यासाठी एक नामांकित परकीय व्यक्ती उरत असे.

सामान्यपणे 'कॉन्व्हेंट' म्हणून ओळखल्या जाणाऱ्या दुसऱ्या प्रकारच्या शाळांत मातृभाषेकडे जाणूनबुजून आणि पद्धतशीरपणे दुर्लक्ष केले जाई. मातृभाषेतला एखादा







शब्द उत्स्फूर्तपणे उच्चारला गेलाच तर वर्गमित्रांकडून हेटाळणी आणि अधिकारी वर्गांकडून कडक जरब मिळत असे. त्या भाषेत बोलल्यास तुच्छ लेखले जात असे. प्रादेशिक संस्कृतीचे ज्ञान अनावश्यक मानले जात असे.

या दोन्हींमधली दरी सांधण्याचा प्रयत्न दोन्हीकडे उपरा ठरत असे. या दोन भिन्न जगांतले विद्यार्थी जेव्हा समोरासमोर येत, तेव्हा त्यांची तोंडे बंद राहात आणि एकमेकांविषयी त्यांना आश्चर्ययुक्त भीती वाटत असे. दुसऱ्या प्रकारातले विद्यार्थी पहिल्या प्रकारातल्या विद्यार्थ्यांच्या इंग्रजी बोलण्यातल्या चुका पाहून समाधान मानत आणि इंग्रजीत चिवचिव करीत. पहिल्यामधले विद्यार्थी प्रादेशिक आणि स्थानिक कार्यक्रमांचे उल्लेख करून आपले काही बिघडले नसल्याचे दाखवीत.

पुढच्या पिढीतले इंग्रजी माध्यमाच्या शाळांकडे जाणारे लोंढे पाहिल्यावर शिक्षणाच्या आपापल्या माध्यमाबद्दल तेव्हा कोणालाच समाधान नव्हते ही वस्तुस्थिती स्पष्ट होते. आज त्याच कुटुंबांत इंग्रजीत बोलणे ही अभिमानाची गोष्ट मानली जाते. आई विचारते, "How many fingers on your feet, beta ?" "Five on my left feet and five on right feet," बेटा उत्तर देतो. "Good," 'मातृदेवता अभिमानाने वदते. लहानगा इंग्रजीत बोलत असतो ! दुसऱ्या प्रकारातल्या पदवीधरांना 'कोऽहं ?'लाच तोंड द्यावे लागे. आपण इथलेच, या मातीतलेच आहोत, हे सिद्ध करण्यासाठी त्यांना अनेक कालबाह्य उपचार शिकावे लागत. स्थानिक भाषेतले कौशल्य सिद्ध केल्याशिवाय शासकीय अधिकारी त्यांना नोकरी द्यायला राजी नसत.

मी मोठी होऊन शिक्षकी पेशा पत्करेपर्यंत स्थिती बदलली होती – 'वाईट'पासून ती 'अधिक वाईटा'कडे गेली होती. सर्व शाळांमध्ये बहुभाषिक सूत्र लागू आहे. एकाच वेळी दोन नव्या भाषा शिकवायला प्रारंभ केला जातो – अगदी तीन वर्षांच्या मुलांसाठी सुद्धा ! परिणामतः प्रत्येकजण भेसळयुक्त भाषा बोलतो आहे.

त्रिभाषा-सूत्र म्हणजे बहुधा 'एका भाषेत तीन भाषा' असे मानले जात असावे ! प्रसिद्ध परकीय भाषा आपला कालावधी संपला तरी येथे राहिली आहे आणि प्रत्येकाच्या मातृभाषेतही घुसली आहे. व्याकरण शिकवणे व शिकणे हे पाप ठरले आहे. शिक्षणाचे माध्यम निवडणे हे अधिकच अवघड झाले आहे. कारण शुद्ध माध्यम उपलब्धच नाही. तीसपेक्षा अधिक भाषा असलेल्या देशाने इंग्रजीला आपलीच एक भाषा म्हणून का स्वीकारू नये हा प्रश्नच आहे. इंग्रजीला थोर तरी मानणे किंवा तुच्छ तरी मानणे हे आवश्यकच आहे का ? तिला डोक्यावर घ्यायची किंवा तिची उपेक्षा करायची गरजच काय ? ■

'दि हिंदू', २ जुलै ०६

# विषमतेच्या समस्येचे खरे मूळ

-क्लॅरेन्स मलोनी
अनुवाद – सुप्रिया सहस्त्रबुद्धे

युरोप आणि पूर्व आशियामधल्या सर्व 'विकसित' देशांत सर्व शिक्षण लोकांच्या भाषांतून असते, हे स्पष्ट आहे. अगदी फिनलँड, हंग्री (हंगेरी) आणि इझ्रेल सारख्या लहान देशांतही जवळजवळ सर्व शाळा आणि महाविद्यालयांत लोकांच्या भाषा वापरल्या जातात. तथापि, युरोपमध्ये माध्यमिक शालेय शिक्षण पूर्ण केलेल्या प्रत्येकाने आणखी दोन भाषांचा अभ्यास केलेला असतो. त्यामुळे त्याला नोकरी, प्रगत उच्च शिक्षण, परिषदा, व्यापार आणि पर्यटन यांत कसलीही अडचण येत नाही. विकासाचा हा उचित आराखडा आहे; पण भारत त्याचा अवलंब करीत नाही.

सांस्कृतिक परंपरेच्या आधारावर आधुनिकीकरणाच्या सुलभ प्रक्रियेची उभारणी करत असताना जनसामान्यांना तिच्यात पूर्णपणे सामील करायचे असेल तर हे काम लोकांच्या भाषेतूनच व्हायला हवे.

युरोपमध्ये लोकांनी जेव्हा लॅटिनचे जोखड फेकून दिले आणि सर्व कामांसाठी प्रादेशिक भाषांचा वापर करायला प्रारंभ केला, तेव्हा संस्कृतींच्या बरोबर त्या भाषाही उत्क्रांत झाल्या आणि आधुनिकीकरण आणि विज्ञान यांचे माध्यम बनल्या. त्याहून अलीकडच्या काळात, चीन, जपान, कोरिया आणि थायलंड या देशांच्या भाषांनी आधुनिकीकरणाचे माध्यम म्हणून चांगली कामगिरी बजावली आहे. आपल्या परंपरेचा विकास करीत असतानाच फक्त पंचावन्न वर्षांत कोरियाने आधुनिकीकरण कसे साध्य केले आहे ते पहा - त्यांनी राष्ट्रीय उत्पन्नाच्या १० टक्के इतका भाग लोकांच्या भाषेतील शिक्षणावर खर्च केला. त्यामुळे तुम्हाला आता कोणत्याही आधुनिक किंवा तांत्रिक विषयावरचे कोरियन भाषेतले पुस्तक खरेदी करता येईल – भाषांतरित नव्हे, तर कोरियन भाषेत लिहिलेले !

आता याची तुलना जगाच्या इतर भागातल्या फिलिपीन्स, मध्य आशिया, आफ्रिकेतील बरेचसे देश आणि दक्षिण आशिया यांच्याशी करा. या देशांतील लोकांच्या मते (उच्च) शिक्षण परकीय भाषेतच असले पाहिजे. जिथे लोकांच्या भाषा आधुनिक







हेतूंसाठी दडपल्या गेल्या आहेत त्या फिलिपीन्समध्ये कोरियासारखी आंतरिक आधुनिक सांस्कृतिक सर्जनशीलता कधी निर्माण होईल अशी कल्पना तरी आपण करू शकतो का ?

भारतातला खरा मुद्दा म्हणजे सामाजिक वर्गाची खूण म्हणून भाषेचा वापर. प्रादेशिक भाषांचा विकास केल्यानंतर युरोपने लॅटिनचा त्याग केला, तसा भारताने उच्च प्रतिष्ठेचे प्रतीक म्हणून संस्कृत आणि पर्शियनचा त्याग केला; पण प्रादेशिक भाषांना आपला सूर सापडण्याऐवजी दुसऱ्याच 'प्रतिष्ठित' भाषेने वर्चस्व स्थापन केले.

अनेक शहरी आणि सुशिक्षित भारतीय आपल्या मुलांना इंग्रजी माध्यमाच्याच पूर्वप्राथमिक शाळांत पाठवतात ही लाजिरवाणी गोष्ट आहे. कोणताही युरोपीय किंवा पूर्व आशियाई असे करणार नाही, आणि जेव्हा कोणी परदेशी व्यक्ती पोलंड, स्वीडन किंवा कोरियात राहायला जातात, तेव्हा त्यांनी तिथल्या भाषा शिकणे अपेक्षित असते, याउलट भारतात जेव्हा परदेशी व्यक्ती रहायला येतात तेव्हा त्यांनी इंग्रजी बोलावे अशी भारतीयांची अपेक्षा असते आणि त्या व्यक्तींनी जर एखादी प्रादेशिक भारतीय भाषा चांगली शिकून घेतली तर भारतीयांना आश्चर्य वाटते.

आमचा भाषिक स्वाभिमान कुठे आहे ? किंबहुना, इंग्रजी-शिक्षित किंवा शहरी 'उच्चभ्रूं'चा भारतातल्या तांत्रिक कामगार आणि शेतकऱ्यांबद्दलचा आदर कुठे आहे ? आणि ते कामगार आणि शेतकरी कोरियातल्याप्रमाणे सहजपणाने परंपरा आणि सर्जनशील आधुनिकीकरण यांचा एकत्र मेळ कधी तरी घालू शकतील का ?

भारतात शेतकी विद्यापीठातले कामसुद्धा इंग्रजीत चालते. त्यामुळे शेतकी पदवीधरांना शेतकऱ्यांची रोपांची आणि रोगांची नावे माहीत नसतात. जेव्हा 'सुशिक्षित' शेतीतज्ज्ञ किंवा अभियंते ग्रामीण लोकांशी बोलतात किंवा चित्रवाणीवर मुलाखती देतात, तेव्हा ते बोलण्यात इतके इंग्रजी शब्द किंवा वाक्प्रचार घुसडतात, की त्यांचे संदेश फुकट जातात. त्यांना प्रादेशिक भाषांतल्या संकल्पना/संकल्पनांची श्रेणी वापरताच येत नाही; त्यामुळे त्यांच्याबद्दल सतत सामाजिक दुरावा जाणवत राहतो.

मानववंशशास्त्रातले एक सर्वपरिचित सत्य आहे – ''भाषा ही संस्कृती असते, आणि संस्कृती भाषा असते,'' कारण भाषा हे संस्कृतीच्या प्रेषणाचे माध्यम असते. भाषाशास्त्रीय अध्ययनातून स्पष्टपणे दिसते, की भाषेमध्ये पूर्ण संस्कृती अंतर्हित असते. सपीर-व्हॉर्फचाही हाच सिद्धान्त आहे. तेव्हा भारतातल्या सार्वत्रिक आधुनिक सांस्कृतिक सर्जनशीलतेचे माध्यम आता कोणते असणार आहे ?

इतक्या शाळा आणि महाविद्यालयांमध्ये एका परकीय भाषेचा इतका सढळ वापर

करण्याचे पुरेसे समर्थन भारतातील भाषिक विविधतेमुळे होऊ शकत नाही. भारत आणि युरोप – दोन्हींमध्ये सुमारे २५ राष्ट्रीय/अधिकृत भाषा आहेत (यांमध्ये लहान 'जमातींच्या' भाषा धरलेल्या नाहीत). पण भारताची लोकसंख्या युरोपच्या जवळजवळ दुप्पट आहे. म्हणजे युरोपमध्ये एक प्रादेशिक भाषा बोलणारे जेवढे लोक असतील, सरासरीने त्याच्या दुप्पट लोक भारतात प्रत्येक अधिकृत / राष्ट्रीय भाषा बोलणारे आहेत. भारतात (आणि त्याच्या आसपास) सात भाषा अशा आहेत की त्या बोलणाऱ्या लोकांची संख्या फ्रेंच निजभाषकांपेक्षा जास्त आहे. पण फ्रेंच किंवा कोरियन भाषांमधील आधुनिक विचार आणि तंत्रज्ञान यांच्या प्रकटीकरणाच्या मानाने आपल्या भाषांत कितीसा तसा आविष्कार आहे ? आणि तरीही अनेक भारतीय भाषा सहस्त्र वर्षांइतक्या जुन्या आहेत, त्यांच्यामध्ये प्रचंड साहित्यसंभार आहे आणि कोणत्याही आधुनिक गरजेसाठी विकसित होण्याची क्षमता त्यांच्यामध्ये आहे.

आपली स्वत:च्या सामाजिक-वर्गाची जाणीव बाजूला ठेवून सर्व पातळ्यांवर प्रादेशिक भाषांमध्ये शिक्षण उपलब्ध होण्यासाठी आवश्यक ते उत्तेजन देणारी व विरोध मोडून काढणारी कायदेशीर पावले उचलणारे खंबीर राजकीय नेते ही आजच्या काळाची गरज आहे. अर्थात इंग्रजीसह दुसरी आणि तिसरी भाषा येणे आवश्यक आहेच. भारताने राष्ट्रीय उत्पन्नाच्या ८ टक्के वाटा शिक्षणाला द्यायला हवा आणि इतर शाळांप्रमाणे सरकारी प्राथमिक शाळांमध्येही लोकांच्या भाषांमध्ये उच्च दर्जाचे शिक्षण दिले जावे यावर भर द्यायला हवा. तसेच युरोपप्रमाणे महाविद्यालये आणि विद्यापीठांमध्ये निदान पदवीवर्गांचे शिक्षण प्रादेशिक भाषांमधून उपलब्ध करण्याच्या धोरणाचा पाठपुरावा करावा. अनेक भाषांमध्ये सर्व शिक्षण आणि एकीकरण-भाषा म्हणून इंग्रजीचा विकास अशा रीतीने युरोपियन युनियनचे काम व्यवस्थित चालते. भारताने भाषिक राज्यांचा किंवा प्रदेशांचा संघ व्हायला हवे; त्यातून नवीन व गतिशील सांस्कृतिक सर्जनशीलतेचा जन्म होईल. पण आपण आधीच पंचावन्न वर्षे वाया घालवली आहेत आणि तेवढ्यात लोकसंख्या तिप्पट झाली आहे !

■

'दि हिंदू', २ जुलै ०६

**महत्त्वाची सूचना :**

'भाषा आणि जीवन'च्या वार्षिक वर्गणीदारांची नव्या वर्षाची वर्गणी पाठवावी. वर्गणीचे तपशील आवरणपृष्ठ 'तीन'वर आहेत.

पुस्तक-परीक्षण

# 'मराठीची कैफियत'

सुभाष भेंडे

[परीक्षित पुस्तक : मराठीची कैफियत : डॉ.वि.बा. प्रभुदेसाई, प्रकाशक : गोमंतक मराठी अकादमी, पर्वरी-पणजी-गोवा, पृष्ठे २२५, किंमत रु. ३८०/-]

नागपूर विद्यापीठातील मराठी विभागाचे भूतपूर्व प्रमुख प्राध्यापक डॉ. वि.बा. प्रभुदेसाई यांनी सादर केलेली 'मराठी कैफियत' मुख्यत्वेकरून गोमंतकातील मराठी भाषेची परंपरा व आजचे स्थान अधोरेखित करते. १९८७ साली अमलात आलेल्या राजभाषा विधेयकानुसार देवनागरी लिपीतील कोकणी ही गोव्याची राजभाषा म्हणून निश्चित झाली आणि शासकीय, शैक्षणिक, सांस्कृतिक इत्यादी क्षेत्रांतील व्यवहारासाठी कोणताही भेदभाव न करता मराठीचा वापर करण्याची मुभा देण्यात आली. गोव्याची राजभाषा म्हणून 'मराठी'चा स्पष्ट निर्देश राजभाषा विधेयकात नाही. मराठीप्रेमी गोमंतकीयांना दुय्यम व उपरे ठरविण्यात आले आहे. मराठी ही गोमंतकाची राजभाषा असून कोकणी ही बोलभाषा आहे, अशी निःसंदिग्ध भूमिका डॉ. प्रभुदेसाई यांनी अनेक वर्षे सातत्याने घेतली आहे. यासंबंधी गेली चाळीसपंचेचाळीस वर्षे वेळोवेळी त्यांनी हे लेखन केले. ते 'मराठीची कैफियत'मध्ये एकत्र करण्यात आले आहे.

'मराठीची कैफियत'मध्ये समाविष्ट करण्यात आलेल्या सर्वच लेखांचे मध्यवर्ती सूत्र राहिले आहे ते गोमंतकातील मराठीचे स्थान. गोमंतकातील कोकणी व मराठी यांचे पूर्वापार जिव्हाळ्याचे संबंध, त्यानंतरचा कोकणी-मराठी वाद, राज्यकर्त्यांकडून झालेला मराठीवरील अन्याय, साहित्य अकादमीचे कोकणीला मान्यता देण्याविषयीचे राजकारण, मराठी माध्यमाची आणि मराठी अध्यापनाची स्थितिगती या विषयावर प्रकाश टाकताना डॉ. प्रभुदेसाई यांनी संपूर्ण बृहन्महाराष्ट्रातील मराठीच्या अभिवृद्धीविषयीचे विचारमंथन केले आहे.

गोमंतकाची प्रमुख वाङ्मय-भाषा अगदी प्राचीन काळापासून मराठीच होती. मराठीचा वारसा गोव्यात प्राचीन काळापासूनचाच आहे. तो महाराष्ट्राने वा अन्य कुणी बाहेरच्यांनी गोवेकरांवर जबरदस्तीने मुळीच लादलेला नाही. अशीच इतिहासाची

प्रामाणिक साक्ष आहे. कृष्णदास शामा या गोमंतकीय आद्य मराठी कवीच्या 'श्रीकृष्णचरित्रकथा' या रसाळ आख्यानकाव्याचे डॉ. प्रभुदेसाईंनी आधुनिक पाठचिकित्सा-शास्त्राच्या आधारे संपादन केले आहे. सन १५२६ साली रचलेल्या या आद्य मराठी काव्यग्रंथाचे अनुकरण परदेशी मिशनरी कवी फादर स्टिफन्स, पाद्री एतिएन-द-ल-क्रुवा आदींनी आपल्या मराठी काव्यग्रंथरचनेसाठी केल्याचे पुरावे डॉ. प्रभुदेसाईंनी दिले आहेत. डॉ. प्रभुदेसाई हे अ.का. प्रियोळकरांचे विद्यार्थी. ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या मराठी लेखनाचा त्यांचा अभ्यास दांडगा आहे. त्यांच्या ग्रंथांचे संदर्भ प्रभुदेसाईंच्या लेखनात वारंवार दिले जातात. मराठीची गोव्यातील पूर्वपरंपरा, उलगडून दाखविण्याच्या दृष्टीने ते संदर्भ फार महत्त्वपूर्ण ठरतात.

'इन्‌क्विझिशन'च्या काळात धर्मांतराची सक्ती गोमंतकीयांवर करण्यात आली आणि हिंदू संस्कृतीचे संपूर्ण उच्चाटन करण्यासाठी पोर्तुगीज सत्तेने कंबर कसली. मात्र पोर्तुगीजांना मराठी भाषेचे गोव्यातून निर्मूलन करता आले नाही. त्यांनी काही प्रमाणात मराठी ही राजभाषा म्हणून टिकवून ठेवली. सरकारी 'गॅझेट'मध्ये पोर्तुगीज मजकुराबरोबर मराठी मजकूर प्रसिद्ध व्हायचा. रजिस्ट्रारच्या कचेरीत नोंद करण्यात आलेल्या दस्तऐवजांचे मराठी भाषांतरही नोंदवले जाई. प्रत्येक तालुक्यात पोर्तुगीज-मराठी संमिश्र शाळा होती. पणजीच्या सरकारी लिसेवमध्ये संस्कृत-मराठी शिकवले जाई. लिस्बन विद्यापीठात संस्कृत-मराठीचा एक विभाग अस्तित्वात होता. गोव्यातील सांस्कृतिक व्यवहाराची भाषा मराठी आहे याची अधिकृत दखल पोर्तुगीज सत्तेने घेतलेली होती.

लुईज-द-ब्रागांझा यांसारख्या ख्रिश्चन विद्वानांनी पोर्तुगीज सरकारने अधिकाधिक मराठी शाळा स्थापन करण्याची आवश्यकता १९२५च्या सुमारास सतत प्रतिपादन केली. गोव्यातील 'येरातदु' या पोर्तुगीज दैनिकाच्या २४ ऑगस्ट १९२७च्या अंकात त्यांनी लिहिले, 'मराठी ही गोव्यातील अर्ध्याहून अधिक प्रजेची मातृभाषा असून ती संपन्न भाषा आहे.' सरकारने आडमुठेपणा सोडून दिला. मराठीस विरोध करण्याचे धाष्ट्यं कधी केले नाही ! १९३७ साली जनता जनार्दनाच्या आर्थिक पाठबळावर चालविल्या जाणाऱ्या खासगी मराठी शाळांची संख्या अडीचशेहून अधिक होती. शिक्षणक्रम महाराष्ट्रात प्रचलित असलेल्या शिक्षणक्रमांसारखाच होता. गोव्यात हिंदूंचे प्रमाण ६५ टक्के तर किरिस्तावांचे प्रमाण ३५ टक्के होते. (मुस्लिम अगदी नगण्य होते.) ख्रिश्चन लोक पोर्तुगीज, इंग्रजी व रोमन लिपीतील कोकणी शिकत. हिंदूंचे सांस्कृतिक पोषण पुण्यामुंबईहून येणाऱ्या 'मराठी ग्रंथां'नी आणि 'केसरी', 'ज्ञानप्रकाश', 'काळ' या नियतकालिकांनी केले.

या सर्व वस्तुस्थितीकडे पूर्णपणे दुर्लक्ष करून कोकणीवाद्यांनी 'ख्रिश्चनांना मराठी कळत नाही हो –' असा आक्रोश केला आणि साहित्य अकादमीकडून देवनागरी लिपीतील कोकणीला मान्यता मिळाली. कोकणी राजभाषा केली. कोकणीची प्रगती झाली, तिचा सर्वांगीण विकास झाला, तर मराठीप्रेमींना दुःख होण्याचे काहीच कारण नाही. मात्र दुर्दैव असे, की कोकणीप्रेमी मंडळी मराठी भाषेच्या द्वेषाने कोकणीचा सवतासुभा स्थापन करू इच्छितात, या वृत्तीला अ.का. प्रियोळकरांसारख्या महान संशोधकाचा विरोध होता. डॉ. प्रभुदेसाई म्हणतात, 'स्व-भाषा विकास म्हणजे अन्य भाषांचा दुस्वास नव्हे हे ध्यानी घेऊन केवळ मराठीच्याच नव्हे, तर कोकणीच्याही अभिवृद्धीच्या दृष्टीने मराठीला गोव्यात राजभाषेचा समान दर्जा देऊन या दोन भाषा-भगिनींमध्ये भावनात्मक एकात्मता निर्माण होणे गरजेचे आहे.

लेखक मडगाव येथे आयोजित करण्यात आलेल्या बाविसाव्या अखिल गोमंतक मराठी साहित्य-संमेलनाचे आणि पणजीच्या आठव्या कोकण मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष होते. मराठीचा वारसा, गोव्याची राजभाषा, शिक्षणात इंग्रजी माध्यमाचे आक्रमण, गोमंतकीय लेखकांचे संदर्भ-साहित्य या विषयांचा या भाषणांत साधार परामर्ष घेण्यात आला आहे. बृहन्महाराष्ट्रातील मराठीच्या अध्यापनाची सद्यःस्थिती काय आहे याचा उहापोहही त्यांनी केला आहे. त्या संदर्भात त्यांनी हैदराबादच्या 'मराठी महाविद्यालया'च्या कामगिरीचे कौतुक केले आहे. या खासगी शिक्षण संस्थेने पदवी परीक्षेपर्यंतचे विद्यापीठ-पातळीवरील संपूर्ण शिक्षण केवळ मराठीतूनच देण्याचा अभिनव उपक्रम १९५८ पासून आजतागायत अत्यंत यशस्वी रीतीने राबविलेला आहे. आंध्रप्रदेशात हा उपक्रम जिद्दीने चालविल्याबद्दल डॉ. प्रभुदेसाईंनी त्याचे मनापासून स्वागत केले आहे. 'श्री ज्ञानेश्वर आणि विज्ञानेश्वर' या अखेरच्या लेखात लेखकाने 'मराठी भाषा जगवायची असेल तर ती ज्ञानभाषा करावी लागेल', असे मत आग्रहपूर्वक मांडले आहे.

डॉ. प्रभुदेसाईंनी सादर केलेली ही 'मराठीची कैफियत' सर्वार्थाने एक ऐतिहासिक दस्तावेज आहे. नव्या पिढीला त्यापासून स्फूर्ती मिळेल यात शंका नाही.

ग्रंथाची निर्मितीमूल्ये वरच्या दर्जाची आहेत. मात्र ग्रंथाची किंमत वाजवीपेक्षा अधिक वाटते.

■

५, ज्ञानदेवी, साहित्य सहवास, वांद्रे (पूर्व), मुंबई 400 051.
दूरध्वनी 022-26591603

पुस्तक-परीक्षण

# भाषाशिक्षणाचा व्यापक विचार

उमाकांत रा. कामत

[परीक्षित पुस्तक : 'भाषाव्यवहार आणि भाषाशिक्षण', संपादक : सुरेंद्र ग्रामोपाध्ये. प्रकाशक : कासेगाव एज्युकेशन सोसायटी, कासेगाव, ता. वाळवा, जि. सांगली, प्रकाशन वर्ष २००६, पृष्ठे १०८+२४, किंमत रु. ९०/-]

आधुनिक काळात ज्ञानाच्या कक्षा रुंदावत गेल्या; पण अभिव्यक्तीचे माध्यम असलेल्या देशी भाषांचा विकास तेवढ्या प्रमाणात झालेला दिसत नाही, उलट नव्या पिढीची भाषिक क्षमता व जाणीव घटत गेलेली दिसते. या समस्येच्या मुळाशी भाषाशिक्षणाविषयीची अनास्था असल्याचे लक्षात आल्याने, कासेगाव शिक्षणसंस्थेने भाषाव्यवहार व भाषाशिक्षण या विषयाच्या विविध पैलूंवर भाषेचे अध्यापक, अभ्यासक व कृतिशील विचारवंत यांचे लेख मागवून त्यांच्या वार्षिकात ते प्रसिद्ध केले. नंतर त्यांची व्यापक सामाजिक उपयुक्तता ध्यानात घेऊन (मौज प्रकाशनाच्या सहकार्याने) ते पुस्तकरूपाने या वर्षारंभी प्रकाशित केले आहेत. त्यात अकरा लेखकांचे १२ लेख असून, 'भूमिका' हे संपादकीय व रा.ग. जाधव यांची विस्तृत प्रस्तावना आरंभी जोडण्यात आली आहे.

भाषाशिक्षण हे प्रत्येक व्यक्तीला अभिव्यक्तीची बहुविध गुणवत्ता देते, तसेच ते व्यक्तिमत्त्वाच्या आंतरिक विकासाशीही निगडीत असते. ही प्रक्रिया शिक्षणव्यवस्थेच्या प्राथमिक ते विद्यापीठीय स्तरापर्यंत चालू राहते, हे लक्षून संपादकांनी एकूण चर्चेची दहा घटकांत विभागणी केली आहे. त्यातील तीन एकूण भाषाव्यवहाराबद्दल असून पुढील सर्व मातृभाषा मराठीच्या अध्यापनासंदर्भात आहेत. हा आराखडा लेखकांना आधी दिलेला नसावा, असे वाटते. कारण सर्वांनी केवळ मराठीच्या संदर्भात व दिलेल्या विषयांचा आपापल्या समजुतीप्रमाणे अर्थ लावून स्वतंत्रपणे लेखन केलेले दिसते.

'आपली भाषाविषयक जाणीव' या प्र.ना. परांजपेलिखित पायाभूत लेखातच याचे प्रत्यंतर येते. वृत्तपत्रांतील वाचकांची पत्रे, हिंदी-इंग्रजीच्या आक्रमणामुळे व इंग्रजी माध्यमामुळे निर्माण झालेल्या भाषिक समस्या, बहुभाषिकता, प्रमाणभाषा व शुद्धलेखन

यासंबंधीचे गैरसमज, भाषाकौशल्ये प्राप्त करून घेण्याबद्दलची अनास्था, इ० वळणे घेत, विद्यार्थ्यांचे भाषिक कौशल्य कसे वाढवावे या चर्चेपर्यंत ते येऊन पोचतात. यातून अपेक्षित विवेचन लाभत नाही.

'भाषाशुद्धतेचे महत्त्व व स्वरूप' हा अरुण फडके यांचा लेख. भाषा परिवर्तनशील असते, पण सर्वांच्या लेखनात एकसूत्रता आणण्यासाठी व लिखिततील आशयाचा सर्वांना समान बोध होण्यासाठी सर्वांनी लेखनाचे समान संकेत पाळले पाहिजेत, हे त्यांचे मूलभूत प्रतिपादन सर्व भाषांना लागू पडते. पुढे त्यांनी मराठीतील वर्णमाला, अनुनासिके तसेच ऱ्हस्वदीर्घ, जोडाक्षरे, रफार, अनुस्वार इ० लेखनघटकांबाबत तपशीलवार चर्चा करून, शुद्धोच्चार व शुद्धलेखन आणि त्यासाठी शब्दकोशाचा यथावश्यक उपयोग यांचे महत्त्व पटवून दिले आहे.

'भाषाव्यवहार व जीवनव्यवहार' हा वस्तुतः शिक्षण व अध्यापन यांच्या वाटेवरचा विस्तृत अवलोकनाचा विषय. पण राजेंद्र ग्रामोपाध्ये यांनी तो काहीसा तत्त्वज्ञानात्मक अंगाने का लिहिला हे समजले नाही.

'भाषाविषय-ध्येय-धोरणे व अध्यापन' यावरचा लेख उमेश प्रधान या विविध शासकीय समित्यांवर काम केलेल्या अनुभवी तज्ज्ञाने लिहिलेला आहे. तथापि तो फार त्रोटक झाला आहे. याबाबतच्या शासकीय धोरणातील बदल शैक्षणिक कारणांपेक्षा राजकीय-सामाजिक कारणांनी प्रेरित झाल्याचे त्यांनी नमूद केले आहे, हे महत्त्वाचे.

'मातृभाषेचे अध्यापन : स्थिती व गती' शीर्षकाच्या लेखात द.दि. पुंडे यांनी अधिक ठोस विचार मांडले आहेत. मातृभाषा-शिक्षणाचा गांभीर्याने विचारच न झाल्याने भारतीय भाषांच्या अस्तित्वखुणा नामशेष होण्यासारखी परिस्थिती उद्‌भवेल, असा इशारा त्यांनी दिला आहे. मराठीच्या वापराबाबत मराठी समाजच उदास-विन्मुख झाला हे दुरवस्थेचे कारण सांगून विविध व्यवहारात व ज्ञानक्षेत्रांमध्ये मराठीचा वापर आणि सकस व सशक्त अध्यापन हे उपाय त्यांनी सुचविले आहेत. मातृभाषेचे व्यवस्थित ज्ञान होण्याआधी इंग्रजीसारखी परभाषा नीट शिकता येणार नाही, हे त्यांचे ठाम प्रतिपादन आहे. चांगली भाषाशक्ती ही व्यक्तिमत्त्व विकासाची गुरुकिल्ली आहे व भाषेच्या नवनिर्माणक्षम शक्तीपर्यंत विद्यार्थ्यांना पोचविणे हे शिक्षणाचे, महत्त्वाचे उद्दिष्टकार्य त्यांनी नमूद केले आहे.

'मराठीतील पाठ्यपुस्तकांचे आकलन व अपेक्षा' या विषयावर गं.ना. जोगळेकर यांनीही स्पष्ट व प्रभावी शब्दात विचार मांडले आहेत. इंग्रजीचे वर्चस्व आणि हिंदीला झुकते माप यांमुळे आपल्याच राज्यात मराठीची गळचेपी होत आहे हे निदर्शनास आणून प्रभावी अध्यापनातून विद्यार्थ्यांची भाषिक क्षमता वाढविणे हाच त्यावरचा उपाय

त्यांनी सांगितला आहे. मुलांची शब्दसंपत्ती वाढविणे, विविध अर्थछटा ओळखून शब्दाची अचूक निवड करण्याची क्षमता निर्माण करणे, भाषासौंदर्य-विचारसौंदर्य-नाट्यात्मक कथनसौंदर्य यांची ओळख त्यांना करून देणे, हे त्यांची विविधांगी आकलनक्षमता वृद्धिंगत करण्याचे मार्ग त्यांनी सांगितले आहेत. प्रथम, द्वितीय व तृतीय भाषा या तीन स्तरांवर पाठ्यपुस्तके कशी तयार करता येतील, याची चर्चाही त्यांनी केली आहे. शिक्षणकार्यात शासनाचा हस्तक्षेप नसावा, शिक्षक, शिक्षणशास्त्रज्ञ व शिक्षणप्रेमी नागरिक यांच्या ताब्यात शिक्षणसंस्था असाव्यात, असा त्यांचा आग्रह आहे. मातृभाषेचा पाया पक्का झाला तरच दुसरी भाषा चांगली येऊ शकते, हेही त्यांनी प्रभावीपणे मांडले आहे.

प्राथमिक स्तरावरील अध्यापनाबाबत रेणू दांडेकर या पुरस्कारप्राप्त कार्यकर्तीचा स्वानुभवावर आधारित लेख मुलांविषयीच्या जिव्हाळ्याने भरलेला आहे. वेगळी बोली बोलणाऱ्या ग्रामीण मुलांना प्रमाणभाषा व औपचारिक शिक्षण यांच्या कक्षेत आणताना घाई करू नये. त्यांची भाषा शिकून घेऊन, शिक्षकाने त्या भाषेत त्यांच्या आवडत्या विषयावर बोलून त्यांना प्रथम आपलेसे करावे. शिक्षक त्यांना आपला वाटला, म्हणजे त्यांची मने खुलतात. शिक्षकाची तळमळ, शिक्षण कार्यावरील निष्ठा, परिश्रमांची तयारी, प्रयोगशीलता आणि मुलांशी नाते जोडण्याची आंतरिक इच्छा हे गुणच तेथे कामी येतात. शासकीय अभ्यासक्रम व नियम यांपेक्षा मुलांशी बांधिलकी महत्त्वाची असते, असा मार्मिक गुरुमंत्र स्वानुभवातून सांगणारा हा लेख शिक्षणक्रियेच्या गाभाऱ्यातच आपल्याला घेऊन जातो.

विविध शासकीय समित्यांवर काम करून अभ्यासक्रम व पाठ्यपुस्तक निर्मितीचा विपुल अनुभव घेतलेले श्री.वा. कुलकर्णी यांचे दोन लेख वेगवेगळ्या गुणांनी लक्षणीय ठरतात. माध्यमिक शिक्षणावरील त्यांच्या लेखात शिक्षणक्रमाची शासकीय विभागणी आणि शिक्षकांकडून अपेक्षा त्यांनी मांडल्या आहेत. शासनाकडून उपलब्ध मार्गदर्शक प्रकाशने व साधने यांचीही माहिती दिली आहे. भाषाविषयाकडे सध्या अग्रक्रमाने कोणी पाहात नाही. तरीही आशावादी विधायक दृष्टी, उपक्रमशीलता आणि विद्यार्थ्यांना घडविण्याची उत्कट इच्छा असणाऱ्या शिक्षकाला यातून कसा मार्ग काढता येईल, याबाबत मोलाचे मार्गदर्शन त्यांनी केले आहे. भाषेच्या अध्यापनाची मूलभूत उद्दिष्टे व वर्तमानकालीन व्यावहारिक उपयोग या दोहोंचाही विचार त्यांनी केला आहे. 'अनुभवग्रहण व कथन' हा त्यांचा लेख म्हणजे मुलांना स्वत:च्या अनुभवांबाबत बोलके कसे करावे, यावर लिहिलेला एक ललित निबंधच आहे. मुलांच्या संवेदनशील पंचेंद्रियांचा भाषिक अध्यापनात कल्पक उपयोग करण्याचा त्यांचा सल्ला सर्व शिक्षकांना

प्रेरणा देणारा आहे. मूल्य शिक्षणासाठी इतिहासातील मार्मिक घटना, अर्थपूर्ण कथा, नाट्ये इ० प्रभावी उपयोग करण्याचा मार्ग त्यांनी सांगितला आहे.

महाविद्यालय व विद्यापीठ स्तरावरील विद्यार्थ्यांमध्ये अपेक्षित असलेल्या मातृभाषेवरील प्रभुत्वाचा अभाव दिसण्यामागे विद्यार्थ्यांची अफाट संख्या, शास्त्र व गणिताचा अवास्तव बडेजाव आणि परिणामी मातृभाषा शिक्षणाची आबाळ या गोष्टी कारणीभूत आहेत या प्रल्हाद वडेर यांच्या विश्लेषणात तथ्य आहे. खुरटलेली आविष्कारशक्ती, अपुरी शब्दसंपत्ती, सूक्ष्म आकलनाचा अभाव, अवांतर वाचनाची गोडी नसणे इ० कारणांमुळे उच्च स्तरावर पोचणारे विद्यार्थी भाषेवर हुकुमत मिळवू शकत नाहीत. परिणामी स्वतंत्र विचार, अभ्यास व संशोधन थंडावलेले असते.

प्रौढांच्या साक्षरतेवरचा इरगोंडा पाटील यांचा लेख बराचसा माहितीपर आहे. प्रौढांना साक्षर करताना स्थानिक बोलीचा व परिसराचा उपयोग आणि निरंतर शिक्षणही आवश्यक ठरतात हे त्यांचे निरीक्षण यथायोग्य आहे.

भाषाभ्यासाच्या साधनांवर लेख लिहिताना प्र.ल. गावडे यांनी कुसुमाग्रज, चित्रा नाईक, वि.वि. चिपळूणकर व अशोक केळकर यांचा संदर्भ देऊन, सर्व क्षेत्रांत मातृभाषाच माध्यम असावी, हे आग्रहाने मांडले आहे. विद्यार्थ्यांचे स्वानुभवविश्व व व्यापक ज्ञानविश्व यांचा सांधा अध्यापनातून जोडण्यासाठी हे आवश्यक आहे. स्वभाषेतील सामाजिक-सांस्कृतिक संचितही मातृभाषेतून त्यांना लाभते व समाज एकात्म होतो. प्रतिकृती, चित्रे याबरोबरच प्रत्यक्ष ऐतिहासिक सांस्कृतिक स्थळांच्या भेटी, प्रदर्शने, मुलाखती, संगणकादि आधुनिक साधने, ध्वनिचित्रफिती इ०ची चर्चा त्या दृष्टीने केली आहे.

रा.ग. जाधव या विद्वान समीक्षकाने ग्रंथाच्या दीर्घ प्रस्तावनेत आजच्या काळातील बहुभाषिकतेची गरज निदर्शनास आणली आहे. मुळात बहुभाषिक असलेल्या आपल्या देशाला जागतिक बहुभाषिकतेशी तोंड देताना आपल्या भाषा अधिक संपन्न व सामर्थ्यवान कराव्या लागतील. त्यासाठी भाषांचे इतिहास, व्याकरण, विविध प्रकारचे शब्दकोश, वाक्प्रचार-म्हणी-सुभाषित कोश, संज्ञा-संकल्पना-कोश, व्युत्पत्तिकोश, भाषांचे द्वैभाषिक-त्रैभाषिक कोश, तुलनात्मक अभ्यास व ज्ञानकोश यांची निर्मिती आवश्यक आहे. शिक्षकांना देशी भाषांचे परस्पर नाते व कोशादींचे पूर्वज्ञानही आवश्यक आहे. एकभाषिक देशातील शिक्षण व बहुभाषिक देशातील शिक्षण यांमधील फरक लक्षात आणून देऊन, मराठी समर्थ व संपन्न करणे हे सर्वांपुढेच आव्हान असल्याचे त्यांनी नमूद केले आहे.

भाषाव्यवहाराच्या परिप्रेक्ष्यात भाषाशिक्षणाचा व्यापक विचार सादर करणारे

पुस्तक एका शिक्षण संस्थेने तयार करून शिक्षक वर्गापुढे व समाजापुढे मांडल्याचे कदाचित हे पहिलेच उदाहरण असावे. त्यात काही उणिवा राहून गेल्या असल्या तरी, या प्रयत्नाचे सामाजिक मोल मोठे आहे, यात शंका नाही.

■

१०२/४-एन्, अशोकनगर, परांजपे मार्ग, वासरा, बोरिवली(प.), मुंबई 400 012.

## ब्रिटनमधील इंग्लिश

काही दिवसांपूर्वी ब्रिटिश कर्मचाऱ्यांचे इंग्रजी, गणित कच्चे असल्याची बातमी आली होती. माझा अनुभव वेगळा नाही. १९९९चा सुमार. योग तत्त्वज्ञानावर व्याख्याने देण्यासाठी लंडनला माझी जा-ये चालू होती. लंडनमध्ये बसने प्रवास करताना बसच्या दारावर मला पुढील मजकुराची एक पाटी दिसली. In the interest passengar safety, drivers have been instructed not to open doors other than at bus stops या मजकुरात except या योग्य शब्दाऐवजी other than असे चुकीचे शब्द योजलेले आहेत. घरी आल्यावर मी Fowler's Modern English Usage हे प्रमाणभूत पुस्तक काढून पाहिले. माझे अवलोकन बरोबर निघाले. मी इंग्लंडमधल्या तीन प्रतिष्ठित वृत्तपत्रांना पत्रे लिहून ही चूक त्यांच्या दृष्टीला आणली. त्यांनी त्या पत्राकडे दुर्लक्ष केले. बस सेवा नियंत्रण मंडळाला पत्रे लिहिली; उडवाउडवीची उत्तरे आली. शेवटी राणीला पत्र लिहिले. राणीच्या सेक्रेटरीचे दोन आठवड्यांत उत्तर आले. त्यात मी दाखवलेली चूक मान्य करून, फाउलरच्याच निर्दिष्ट पुस्तकाचा हवाला देऊन अशा चुकांची दुरुस्ती करण्यात आपली असहायता प्रकट केली आहे. इंग्लिश शिकण्यासाठी इंग्लंडला जाण्याचे दिवस आता इतिहासजमा झाले आहेत. आता इंग्लिश शिकण्यासाठी इंग्लंडमधल्या लोकांनी भारतात येण्याचे दिवस आले आहेत.

– कृ.श्री. अर्जुनवाडकर, दै. सकाळ, ३-१०-२००६, पुणे.





अनुक्रमणिका

पुस्तक-परीक्षण

# अमराठी विद्यार्थ्यांसाठी 'पाठ्यपुस्तक' !

यास्मिन शेख

[परीक्षित पुस्तक : 'मराठी शारदियेच्या चंद्रकळा', मराठी उच्च अभ्यासक्रमासाठी पाठ्यपुस्तक, संपादन : सुमन बेलवलकर – प्रकाशक : भारतीय भाषा संस्थान, मैसूर. प्रकाशन वर्ष २०००, किंमत रु. १२०/-]

'भारतीय भाषा संस्थान', मैसूर, या संस्थेची स्थापना १७ जुलै १९६९ रोजी झाली. केंद्रीय शासनाच्या त्रिभाषासूत्रानुसार भारतातल्या माध्यमिक शिक्षकांना प्रादेशिक भाषांचे प्रशिक्षण देण्यासाठी या संस्थेने केलेले कार्य प्रशंसनीय आहे. शिक्षकांना परप्रांतीय भाषा विद्यार्थ्यांना शिकवता याव्यात हा या प्रशिक्षणामागील हेतू आहे. त्या दृष्टीने उपयुक्त ठरतील अशी पाठ्यपुस्तके त्या त्या भाषेतील तज्ज्ञांकडून तयार करण्यात आली. प्रशिक्षणाचा अभ्यासक्रम तीन टप्प्यांत विभागला आहे. पहिला टप्पा हा भाषेची संरचना शिकवणारा प्राथमिक अभ्यासक्रम. दुसरा टप्पा - माध्यमिक - त्या त्या भाषेतील लिखाणाचे वाचन करता येणे व त्या भाषेत अचूक लेखन करता येणे हा होय. ही कौशल्ये आत्मसात करतानाच त्या त्या प्रदेशातील संस्कृती व जीवनपद्धती यांचा परिचय करून देणारे पाठ्यपुस्तक विद्यार्थ्यांनी अभ्यासावे हीही अपेक्षा आहे. तिसरा टप्पा हा उच्चस्तरीय आहे. यासाठी पाठ्यपुस्तक सिद्ध करताना विद्यार्थ्यांमध्ये त्या त्या भाषेतील श्रेष्ठ साहित्यिकांच्या उत्तम साहित्यकृतींविषयी रुची उत्पन्न करणे व त्या कलाकृतींचा आस्वाद घेण्याची क्षमता निर्माण करणे हा हेतू डोळ्यांसमोर ठेवला आहे.

'मराठी शारदियेच्या चंद्रकळा' हे पाठ्यपुस्तक मराठी भाषेच्या उच्चस्तरीय अध्ययनासाठी अमराठी विद्यार्थ्यांना उपयुक्त व्हावे यादृष्टीने डॉ. सुमन बेलवलकर यांनी संपादित केले आहे. ज्या परभाषकांनी मराठी भाषाभ्यासाचे पहिले दोन टप्पे – प्राथमिक व माध्यमिक – ओलांडलेले आहेत, त्यांना मराठीतील संपन्न साहित्याचा आस्वाद घेता यावा आणि त्याबरोबरच मराठी भाषेतील विविध प्रकारच्या वाक्यरचनांचा परिचय व्हावा, तशा प्रकारच्या वाक्यरचना करण्याची क्षमता त्यांच्यात

निर्माण व्हावी, अनेक शब्द, त्यांच्या अर्थांच्या विविध छटांचे आकलन व्हावे, पूरक लेखन-वाचन करता यावे या हेतूने पाठांची निवड व त्यांवरील प्रश्न इ०ची मांडणी प्रस्तुत पाठ्यपुस्तकात केली आहे.

**पाठ व कविता यांची निवड** : महाराष्ट्रीय संस्कृतीची ओळख व्हावी व मराठी मनाचे चलनवलन समजावे हा उद्देश समोर ठेवून मराठी नाटक, कादंबरी, ललित व वैचारिक निबंध, प्रवासवर्णन, आत्मचरित्र इत्यादी साहित्यप्रकारांतून वेचक उतारे संपादिकेने निवडले आहेत. येथे एक त्रुटी जाणवली, ती नमूद करणे अप्रस्तुत ठरणार नाही. मराठी लघुकथेचे दालन अत्यंत समृद्ध आहे. या पाठ्यपुस्तकात एकही लघुकथा निवडलेली नाही, याचे आश्चर्य वाटते. नाट्यउतारे चार निवडले आहेत. त्यांतील एखादा कमी करून कथा निवडता आली असती.

पाठ व कविता निवडताना मराठीच्या प्रमाणभाषेबरोबरच मराठीच्या काही बोलींची – अहिराणी, सातारी, कोकणी – विद्यार्थ्यांना तोंडओळख व्हावी याचाही विचार संपादिकेने केला आहे, हे विशेष. मात्र त्या बोलींची, निदान अहिराणी बोलीची, प्रमुख वैशिष्ट्ये टिपणात सांगितली असती तर त्या बोलींचे स्वरूप कळण्याच्या दृष्टीने विद्यार्थ्यांना मदत झाली असती.

या उताऱ्यांतून ''निसर्गवादी, शेतकरी, विदुषी, दलित, पददलित या सर्वांच्या जीवनाचे दर्शन घडते.'' हा संपादिकेचा दावा मात्र तितकासा बरोबर नाही. या सर्वांच्या जीवनाच्या एखाद्या पैलूचे दर्शन घडते असे म्हणणे हे सत्याला धरून होईल.

संपादिकेने प्रस्तावनेत असे विधान केले आहे, की ''विद्यार्थ्यांच्या आकलनाच्या कक्षेचा विचार करून उताऱ्यांची निवड केली आहे.'' पण 'पंढरपूरचा विठोबा' - दुर्गा भागवत, 'शरावती' - रा.भि. जोशी, 'तुळजाभवानी' - पं. महादेवशास्त्री जोशी हे उतारे अमराठी विद्यार्थ्यांच्या 'मर्यादित भाषाशक्ती'चा विचार करता फार अवघड आहेत.

पाठांच्या निवडीमध्ये हिंदुधर्म, पूजा, व्रते, हिंदू संस्कृती यांवर प्रमाणापेक्षा अधिक भर दिलेला दिसतो. महाराष्ट्रीय संस्कृतीचा, महाराष्ट्रातील एखाद्या समाजसुधारकाचा, आगरकर, टिळक, रानडे, बाबा आमटे, अनूताई वाघ, अशा एखाद्या मान्यवर व्यक्तीच्या कार्यासंबंधीचा लेख निवडता आला असता. महाराष्ट्रातील स्त्रियांचे जीवन, अंधश्रद्धेचे वाढते प्रमाण, महाराष्ट्राच्या जडणघडणीत एखाद्या श्रेष्ठ विचारवंताचे योगदान, असे काही लेख निवडले असते तर परभाषकांना महाराष्ट्राचे सांस्कृतिक जीवन खऱ्या अर्थाने कळले असते.

**लेखक परिचय** - संपादिकेने पाठाच्या सुरुवातीला लेखकाचा परिचय करून दिला आहे; पण तो सोप्या शब्दांत द्यायला हवा होता. 'परिचया'त शीलवती केतकरांचा मृत्युसन १९३७ दिला आहे. तो त्यांचे पती डॉ. श्री.व्यं. केतकर यांचा आहे. तसेच, पु.ल. देशपांडे यांचा परिचय करून देताना ''या बहुगुणी कलावंताने कलेच्या प्रत्येक क्षेत्रात आपला वेगळा ठसा उमटवला'' असे विधान केले आहे. (अधोरेखन माझे). 'प्रत्येक'ऐवजी 'कलेच्या अनेक क्षेत्रांत' असे म्हणणे उचित झाले असते.

लेखकाच्या परिचयाबरोबरच ज्या नाटकातून, आत्मकथनातून किंवा कादंबरीतून उतारा निवडला असेल, त्या कलाकृतीचा थोडक्यात परिचय करून देणे आवश्यक होते. पाठ ६, 'मातीचा वास' – लेखक अच्युत बर्वे यांच्या 'मातीचा वास' या कादंबरीचे कथासूत्र 'परिचया'त सांगितले आहे. पण हा एकच अपवाद आहे. बाकी कुठल्याही नाट्यउताऱ्यांच्या, कादंबरीच्या संदर्भात असे कथासूत्र सांगितलेले नाही.

**कवितांची निवड** - केशवसुत, भा.रा. तांबे, नारायण सुर्वे, मर्ढेकर, इंदिरा संत इ० कवींच्या निवडलेल्या कविता प्रौढ विद्यार्थ्यांना रस वाटेल अशा आहेत. मर्ढेकरांची 'फलाटदादा' ही कविता चांगली पण प्रदीर्घ आहे. पण कुसुमाग्रज, विंदा करंदीकर, वसंत बापट, यशवंत, माधव जूलियन अशा मराठीतील महत्त्वाच्या कवींना निवडीतून का वगळले हे समजले नाही.

**शब्दार्थ** - शब्दांचे केवळ शब्दकोशातील अर्थ न देता, संदर्भ लक्षात घेऊन त्या शब्दांचे स्पष्टीकरण दिले आहे, हे परभाषकांच्या आकलनाच्या दृष्टीने समाधानकारक वाटते. पण अनेक महत्त्वाच्या (व अपरिचित) शब्दांचे अर्थ द्यायचे राहून गेले आहेत. पुढील काही शब्द पाहा –

पाठ १४ : पंढरीचा विठोबा - संप्रदाय, पुंडलिक, श्रद्धा, पूर्वज, प्रथा, तुकतुकीत, उमाळा, हुकूमत, मानवमूर्ती – देवमूर्ती.

पाठ १६ : शरावती – उज्ज्वल, लावण्य, शुचिस्मित, मंदाराचल, कल्पान्त, कुंड, शेवाळलेले, वृंदावन, गंगावतरण, अलौकिक, कष्टसाध्य, दिव्यत्वाचा साक्षात्कार.

पाठ १७ : तुळजाभवानी - स्वयंस्फूर्ती, मंदिरप्रकार, रौप्यमुद्रा, खिळवणे, औचित्य, आचरटपणा, अघोरीपणा, संदिग्ध, आवळा देऊन कोहळा काढणे.

कविता ६ : फलाटदादा - तल्लख, फुफाट, विलायती, गुपिते, झगाळ, गृहलक्ष्मी, मिस्किल, गोमटी, पहाडी हिंमत.

**सांस्कृतिक टिपा -** अनेक उताऱ्यांतील सांस्कृतिक संदर्भ लक्षात घेऊन सविस्तर टिपा दिलेल्या आहेत, हे या पाठ्यपुस्तकाचे वैशिष्ट्य स्वागतार्ह आहे. 'वाढदिवस' यावर टीप (पृ. ५३) दिली आहे; त्यात 'त्या दिवशी खांबाची पूजा करतात,' असे विधान केले आहे. आज ही प्रथा अस्तित्वात नाही. पृ.६१वर 'विटाळ होणे' यावर पुढीलप्रमाणे टीप दिली आहे – 'ब्राह्मणाला नीच जातीच्या माणसाचा स्पर्श झाला तर त्याला विटाळ होतो, म्हणजे त्याचं पावित्र्य भ्रष्ट होतं अशी समजूत आहे. अस्पृश्याची सावली जरी ब्राह्मणाच्या अंगावर पडली तरी त्याला विटाळ होतो'...

कुठल्याही जातीला व धर्माला 'नीच' म्हणणे किंवा दलितांना 'अस्पृश्य' म्हणणे हे अत्यंत अपमानकारक व निषिद्ध आहे. पृ. ७२ वर 'अस्पृश्य' हा शब्द योजिला आहे. पृ. ७८ वर 'तुमच्या प्रांतातल्या अस्पृश्यांच्या जीवनाविषयी तुम्हांला काय माहिती आहे?' असा प्रश्न विचारला आहे. संपादिकेला 'नीच', 'अस्पृश्य' या शब्दांऐवजी 'दलित', 'पददलित' हे शब्द योजता आले असते. साठसत्तर वर्षांपूर्वी श्री.म. माटे यांनी 'अस्पृष्ट' हा शब्द योजला होता. कोणत्याही जातीजमातीला दुखवणे योग्य नव्हे, याचा विवेक संपादिकेने केलेला नाही असे खेदाने म्हणावेसे वाटते.

**प्रश्न, पूरक वाचन लेखन –**

प्रस्तुत पाठ्यपुस्तकात उताऱ्यांचे आकलन होण्याच्या दृष्टीने विचारलेले प्रश्न बहुतांशी चांगले आहेत. पण काही प्रश्नांची उत्तरे 'हो' किंवा 'नाही' किंवा एकाच शब्दात देता येतील. असे प्रश्न वेगळ्या पद्धतीने विचारता आले असते. 'होय'/'नाही' प्रकारचे प्रश्न विचारपूर्वक टाळता आले असते, कारण असे प्रश्न विद्यार्थ्यांच्या विचारशक्तीला व अभिव्यक्तीला चालना देणारे नाहीत. उदाहरणार्थ, 'शालेय मराठी आणि झोपडपट्टी' या लेखावरील पृ. ११७ वरील प्रश्न - 'झोपडपट्टीतील मुलांना शिक्षणासाठी प्रोत्साहन मिळावे असे वातावरण असते का ?' हा प्रश्न 'हो' किंवा 'नाही' या उत्तराची अपेक्षा करतो. त्याऐवजी 'झोपडपट्ट्यांतील मुलांना शिक्षणासाठी प्रोत्साहन का मिळत नाही ?' असा प्रश्न विचारला, तर विद्यार्थी पाठाच्या आधारे कारणमीमांसा करू शकतील.

काही प्रश्न तर असे विचारले आहेत की, त्याची उत्तरे देणे मराठी भाषकालाही कठीण वाटेल. उदा० पृ.७८ वरील प्रश्न '' 'तो मी नव्हेच..' हा उतारा आणि 'बलुतं' यांची तुलना करा.'' या प्रश्नाचे कोणते उत्तर अपेक्षित आहे हे समजत नाही. माझ्या मते हा प्रश्नच चुकीचा आहे. एक नाटकातील उतारा व दुसरा आत्मकथनातील उतारा. त्यांची तुलना कोणत्या दृष्टीने होईल ? संपादिकेला कोणते उत्तर अभिप्रेत आहे ?

प्रस्तावनेत म्हटले आहे, ''विद्यार्थ्यांच्या आकलनाच्या कक्षेचा विचार करून पु.ल.

देशपांडे व आचार्य अत्रे यांचे विनोदी लेखन बाजूला ठेवून त्यांच्या नाटकातील 'गंभीर' उतारे'' निवडले आहेत. याचा अर्थ असा, मराठीतील विनोद कळण्याइतकी भाषेची जाण अमराठी विद्यार्थ्यांना नसणार. मग 'कावळ्यांची शाळा' या उताऱ्यावर 'कावळ्यांची शाळा या उताऱ्यातला विनोद' यावर टीप लिहायला सांगितली आहे, ती, प्रस्तावनेतील विधान लक्षात घेता, अमराठी विद्यार्थ्यांना लिहिणे कितपत जमेल ?

पृ. ४२वर नाटकांतून निवडलेल्या चार उताऱ्यांवर प्रश्न विचारला आहे – 'तुम्ही अभ्यासलेल्या नाटकांच्या उताऱ्यांच्या आधारे मराठी नाटकांविषयी एक निबंध लिहा.' असा निबंध निवडलेल्या उताऱ्यांच्या आधारे मराठी मातृभाषा असलेल्या पदवीधर विद्यार्थ्यालाही लिहिता येणार नाही ! पुढे प्रश्न ३ असा आहे –'तेंडुलकर, अत्रे, पु.ल., श्री.ना. पेंडसे या चारांच्या भाषाशैलीचे विशेष सांगा.' एवढ्या छोट्या उताऱ्यांवरून भाषाशैलीचे विशेष सांगता येणे कठीण. विद्यार्थ्यांच्या भाषेची, अभिव्यक्तीची क्षमता लक्षात घेतली असती तर असे प्रश्न सहज टाळता आले असते. याच्या पुढेच – ''तुमच्या प्रांतात कोणत्या देवीचे ठिकाण जास्त प्रसिद्ध आहे, त्याची माहिती द्या.'' असे विचारले आहे. हिंदू - व्यतिरित जैन, ख्रिश्चन, मुस्लिम, पारशी, शीख इ० इतर धर्मांचे मराठी भाषा शिकणारे अमराठी विद्यार्थी असतीलच. त्यांना त्या त्या प्रांतातील देवीच्या ठिकाणाची माहिती असणे कठीण आहे. वरील दोन्ही प्रश्नांत विद्यार्थी हिंदूच आहेत असे गृहीत धरलेले दिसते ! पाठ्यपुस्तकात असे धार्मिक स्वरूपाचे प्रश्न टाळणेच इष्ट ठरले असते.

**कविता–विभाग**

कविता पहिली – जनाबाईचा अभंग. यावर पूरक लेखन/वाचन या शीर्षकाखाली 'दृष्टान्त पाठमाला' या ग्रंथातील 'वानरीएचा दृष्टान्त' वाचायला सांगितला आहे. या पुस्तकातील भाषा १३व्या शतकातील आहे. मराठी मातृभाषा असलेल्या विद्यार्थ्यांनासुद्धा शिक्षकाच्या मदतीशिवाय हा दृष्टान्त कळणे कठीण. तेथे अमराठी विद्यार्थ्यांकडून हा उतारा त्यांनी वाचावा ही अपेक्षा करणे योग्य नाही.

अनिलांच्या 'घरी' या कवितेवर 'पूरक लेखना'त पृ. १९० वर 'या कवितेचे काव्यरूप भाषान्तर करा,' असे सांगितले आहे. एखाद्या प्रतिभावंत कवीलाही ही गोष्ट कष्टसाध्य आहे, तेथे अमराठी विद्यार्थ्यांचा काय पाड ? शिवाय, भाषान्तर कोणत्या भाषेत – इंग्रजीत, हिंदीत की त्या त्या विद्यार्थ्यांच्या मातृभाषेत अपेक्षित आहे, ह्याचाही प्रश्नात उल्लेख नाही. आणि ते तपासणारा तज्ज्ञ कोण ?

**शुद्धलेखन – चुकांचे वैविध्य**

शुद्धलेखनाच्या तर असंख्य चुका प्रस्तुत पुस्तकात आहेत. मैसूरमधील अमराठी संस्थेत पुस्तक छापले, तेव्हा चुका होणारच, असे म्हणून चालणार नाही. अमराठी विद्यार्थ्यांसमोर इतक्या विविध प्रकारच्या असंख्य चुकांनी भरलेले पाठ्यपुस्तक अभ्यासासाठी ठेवणे योग्य नाही.

जागेअभावी सर्व चुकांची प्रस्तुत लेखात नोंद करणे शक्य नाही. चुकांचे काही प्रकार आणि त्यांची काही उदाहरणे पुढे देत आहे.

(१) जोडाक्षरांचे मुद्रण ती तोडून केल्यामुळे ती दोन स्वतंत्र अक्षरे वाटतात. उदा० नाटयरूस (ट्य), पाठयपुस्तक (ठ्य), गडयाला (ड्या), पिढया नि पिढया (ढ्या), लाहुया (ह्या), आलयावर (ल्या), ब्राहमणाचे (ह्म), डोळयात (ळ्या).

(२) निष्काळजीपणातून झालेल्या चुका :

पेक्शा (क्षा), वाव्ये (क्ये), मृटलं (म्ह), वरिष्ठांबध्दल (द्द), नक्याबद्दल (नव्ऱ्या), श्हवा, श्हवं (?), म्हणातात (ण), साकाळचा (स), बालोघान ('द्या'), तहुेने (ऱ्हे), रक्तक्तात (रक्तात), तत्था (?) मासी कोगती (माझी कोणती), वेढाबिगारीने (ठ), शाराणता (जाणारच), वाकुथातलया (क्या), हदयावर (हृ).

(३) काही शब्द तोडून लिहिलेले आहेत :

सदो दित, निः संदिग्धपणा, मनः स्थिती, झोपड पट्टी, तुळजा भवानी, खे ड्यातल्या, खो टा, महात्म्या त, एर वादी (ख), माझ्या बरोबर, वडिलां कडून, आई सुद्धा, पाहिलं सुद्धा, शिकाऱ्या ऐवजी, खेड्या तली, वेशी बाहेरचे, इ०

याउलट वेगळे असलेले शब्द जोडून छापलेले आहेत :

कारे (का रे), आईग (आई ग), घोकनारे (घोक ना रे), येनाग (ये ना ग), लाडू देनाग (दे ना ग), (**टीप :** संपादिकेने लाडू देनाग हा शब्द एक आहे असे मानलेले दिसते. त्या संबंधीच्या विवेचनावरून हे लक्षात येते.) जाऊया (जाऊ या), राहूदे (राहू दे), देवजाणे (देव जाणे), तुझ्यादारी (तुझ्या दारी), रंगवलेआहे (रंगवले आहे), आईनंतर (आईनं तर) इ०

(४) आणखी काही चुकीचे शद्धलेखन :

बहुभाषिक (ष), सहस्त्रशः (स्र), सहस्त्रावधी (स्रा), तर्जेदार (द), योतो (ये), दारिध्रच (द्र्य), बुध्दीचा (द्धी), ताबडतोप (ब), पिंडाळा (ला), आत्मवृतांविषयी (त्ता), उधड (घ), धेव्याजोगा (घेण्या), पाहिवरल्या (पाहिल्यावर), राजवाडवर (?), गोळी (गे), बांधण्यापूर्वी (बां).

केशवसुतांचे नाव असे छापले आहे : 'ऊर्फ श्री. कृष्णनी केशव दामले. कवी केशवसुत.

अशा अगणित चुका या पाठ्यपुस्तकात पानोपानी आढळतात.

(५) महामंडळाच्या लेखनविषयक नियमांप्रमाणे लेखन करणे आवश्यक आहे, ते नियम धाब्यावर बसवून लेखन केल्यामुळे झालेल्या चुका :

दोन पद्धतीनी (तीं), शरिराच्या (री), कुटुंबियांचे (बी), औदासिन्य (सी), रंगित (गी), विद्यार्थीदशेत (र्थि), नातेवाईकांनी (इ), अन (न्), वापरुन (रू), गुरूवारी (रु), ययातिच्या (ती), आंतरीक (रि), पहाता (पाहता), रहातो (राहतो), (करुन (रू), इ०इ०

(६) मेरी क्यूरी यांच्या नावाचे स्पेलिंगही या पाठ्यपुस्तकात चुकलेले आहे.

(७) आणखी काही महत्त्वाच्या चुका येथे नोंदवणे आवश्यक आहे.

तृतीयेचा एकवचनी प्रत्यय ने (नं) आहे. संपादिकेने अनेक ठिकाणी लेखकांच्या लेखांतही 'नी' हा प्रत्यय वापरला आहे. काही ठिकाणी 'नी' तर काही उताऱ्यांत 'नी', 'ने', 'नं' हीही प्रत्ययाची रूपे वापरली आहेत. मूळ पुस्तकातील तृतीया एकवचनाचे रूप कायम ठेवून, फार तर 'टिपे'त असे विधान करता आले असते – ''तृतीयेच्या एकवचनी 'ने' या प्रत्ययाचा उच्चार मराठी भाषक बरेचदा 'नी' असा करतात.'' अशी धरसोड अमराठी विद्यार्थ्यांच्या दृष्टिकोणातून पाहता योग्य नव्हे.

दुसरे, एकाच लेखात 'ए'काराऐवजी अनुस्वार आणि 'ए'कार असाही प्रकार अनेक ठिकाणी झाला आहे. पाठ १, कावळा- 'परिचया'त 'त्याचे स्वतःचे, कुटुंबियांचे (बी) जीवनचित्र आहे असे मानले जाते' असे वाक्य आहे, तर पुढच्याच वाक्यात----ही त्यांची पुस्तकं---' असे लिहिले आहे.

**चुकीची विधाने :** पृ. ५६ वर असे विधान आहे – '' 'पोकळ' या विशेषणापासून भाववाचक नाम इंग्रजीतील हिंदी 'पन'सारखा हा प्रत्यय आहे.'' हे विधान असे हवे होते – ''मराठीतील काही विशेषणांना 'पणा' हा प्रत्यय लागून भाववाचक नामे तयार होतात.''

पृ. ६ वर 'लांब', 'उंच' यांना अव्यय म्हटले आहे. मराठीतील 'अ'कारान्त, 'ई'कारान्त व 'उ'कारान्त विशेषणे ही अविकारी आहेत; पण त्यांना अव्यय म्हणता येणार नाही. बरे, पृ. ४८ वर 'उंच' हे विशेषण आहे असे संपादिकेने म्हटले आहे. अशी विसंगती का ?

पृ. १२४ वर 'बदल' हे क्रियापद आहे असे म्हटले आहे. त्याला धातू म्हणणे अधिक बरोबर होईल. विधान असे आहे – ''बदल (पु.) जेव्हा नाम असते, तेव्हा

'होणे' हे क्रियापद येते.'' हे विधान बरोबर नाही. 'त्याने माझ्या लेखात बदल केला (करणे) असेही वाक्य होऊ शकेल. पृ. १३५ वर प्रश्न ३ – ''विशिष्ट नामांसाठी विशिष्ट क्रियापदच वापरायचे,'' या विधानाच्या संदर्भात 'स्नान घालतात', 'हळदकुंकू वाहतात', 'बुक्का उधळतात' ही उदाहरणे दिली आहेत. हेही विधान संपूर्ण बरोबर नाही. 'स्नान करणे', 'हळदकुंकू लावणे', 'बुक्का लावणे' किंवा 'पुसणे' असेही धातू या शब्दांबरोबर येऊ शकतात. वरील विधाने चुकीचे मार्गदर्शन करणारी आहेत.

आणखी एक चूक म्हणजे रमाबाई रानडे यांच्या आत्मचरित्राचे नेमके नाव 'आमच्या आयुष्यातील आठवणी' नसून 'आमच्या आयुष्यातील काही आठवणी' असे आहे.

**विरामचिन्हे :** पूर्णविराम, स्वल्पविराम, संयोगचिन्ह, अवतरणचिन्ह इ० सर्वच विरामचिन्हांच्या उपयोगात अगणित चुका झाल्या आहेत.

प्रस्तुत पाठ्यपुस्तकातील इतक्या विविध प्रकारच्या चुका पाहता, हे पाठ्यपुस्तक म्हणजे मराठीत किती प्रकारच्या चुका करता येऊ शकतात याचा एक नमुनाच आहे, असे खेदाने म्हणावेसे वाटते. कोणतेही पुस्तक, विशेषत: विद्यार्थ्यांना शिकवायचे पाठ्यपुस्तक हे जास्तीत जास्त निर्दोष असणे अत्यंत गरजेचे आहे, या महत्त्वाच्या बाबीकडेच या पुस्तकाच्या निर्मितीत संपूर्ण दुर्लक्ष झाले आहे, आणि ते अक्षम्य आहे. ■

२/४, विसावा हाइट्स, डी.पी.रोड, औंध, पुणे 411 007.
दूरध्वनी - 25884472

---

## संदर्भ कसे द्यावेत ?

संदर्भ देण्याची नवी, सोयीस्कर व जागेचा अपव्यय टाळणारी पद्धत पुढे दिली आहे. या पद्धतीचाच लेखकांनी आपल्या लेखात उपयोग करावा : लेखात ज्या ठिकाणी संदर्भ द्यावयाचा असेल तेथ कसामध्ये संबंधित पुस्तक-लेखकाचे नाव द्यावे आणि त्यापुढे संदर्भित पुस्तक/लेखाचे प्रकाशनवर्ष द्यावे. त्यानंतर, आवश्यक असल्यास, स्वल्पविराम देऊन पृष्ठक्रमांक लिहावा व कंस पुरा करावा. लिखाणाच्या अखेरीस 'संदर्भसूची'मध्ये संदर्भातील सर्व तपशील द्यावेत. सूचीतील प्रत्येक नोंदीतील तपशिलांचा क्रम साधारणपणे असा ठेवावा : लेखकाचे आडनाव, स्वल्पविराम, नावांची आद्याक्षरे, प्रकाशनवर्ष, ग्रंथाचे शीर्षक, पूर्णविराम, प्रकाशनसंस्था, स्वल्पविराम, प्रकाशनस्थळ, पूर्णविराम. संदर्भसूची मराठीच्या वर्णक्रमानुसार असावी.

पुस्तक-परीक्षण

# सिंधी कथांचा रोचक अनुवाद

न. म. जोशी

[परीक्षित पुस्तक : 'अनाहूत आणि इतर सिंधी कथा', अनुवादक व प्रकाशक : लछमन हर्दवाणी, 'कविता' प्रोफेसर कॉलनी, सावेडी, अहमदनगर, पृष्ठे १२८, किंमत -विनामूल्य ]

प्रा. लछमन हर्दवाणी हे अभ्यासू व उद्यमशील लेखक आहे. मातृभाषा सिंधी असलेले हर्दवाणी मराठी व हिंदी या भाषांचेही जाणकार आहेत. 'अनाहूत' या कथासंग्रहात हर्दवाणी यांनी केलेला सिंधी साहित्यातील १८ श्रेष्ठ (त्यांच्या मताने) सिंधी लेखकांच्या कथांचा अनुवाद अंतर्भूत आहे. अमरलाल हिंगोरानी, कीरत बाबाणी, गोवर्धन भारती, मोहन कल्पना, गुनो सामतानी, इ० नामवंत सिंधी कथाकारांच्या कथांचे सुरस व सरल अनुवाद या संग्रहात आहेत.

लघुकथा या स्वरूपातील सिंधी कथा १९२३पासून सुरू झाली असे मानण्यात येत असले तरी त्या कथांचे स्वरूप प्रामुख्याने अनुकरणात्मक व भाषांतरीत असे होते. १९२५ ते १९४० या कालखंडात सिंधीमध्ये भारतीय भाषांतील कथानुवादांची लाट आली. त्याचप्रमाणे सिंधी लेखकांना इंग्रजी कथांच्या अनुवादामुळे लघुकथेचे तंत्र आणि मंत्र अवगत होऊन पुढे सिंधीमध्ये चांगल्या कथा निर्माण झाल्या. १९६० नंतर सिंधी कथेने चांगले कसदार वळण घेतले. फाळणीच्या कथा आणि व्यथा सिंधी कथेत अवतरल्याच, पण त्यानंतरच्या काळातील सिंधी समाजाच्या आशा-आकांक्षा, आर्थिक पराक्रम, सामाजिक घुसमट, मातृभूमीचं प्रेम या सर्व भावभावना सिंधी कथेत सकसपणे येत गेल्या. अशा सर्व प्रवाहांचा व कालखंडांचा प्रातिनिधिक विचार करून श्री. हर्दवाणी यांनी गेल्या ५० वर्षांत लिहिल्या गेलेल्या निवडक २० सिंधी कथा या संग्रहात सादर केल्या आहेत.

श्री. कृष्ण खटवाणी यांची 'अनाहूत' ही या संग्रहातील सहावी कथा आहे. या संग्रहाला 'अनाहूत' हेच नाव लेखकाने का दिले हे मात्र पुरेसे स्पष्ट होत नाही. सर्वच कथा प्रातिनिधिक या दृष्टीने चांगल्या असल्या तरी 'अनाहूत' या कथेपेक्षा कितीतरी

'होणे' हे क्रियापद येते.'' हे विधान बरोबर नाही. 'त्याने माझ्या लेखात बदल केला (करणे) असेही वाक्य होऊ शकेल. पृ. १३५ वर प्रश्न ३ – ''विशिष्ट नामांसाठी विशिष्ट क्रियापदच वापरायचे,'' या विधानाच्या संदर्भात 'स्नान घालतात', 'हळदकुंकू वाहतात', 'बुक्का उधळतात' ही उदाहरणे दिली आहेत. हेही विधान संपूर्ण बरोबर नाही. 'स्नान करणे', 'हळदकुंकू लावणे', 'बुक्का लावणे' किंवा 'पुसणे' असेही धातू या शब्दांबरोबर येऊ शकतात. वरील विधाने चुकीचे मार्गदर्शन करणारी आहेत.

आणखी एक चूक म्हणजे रमाबाई रानडे यांच्या आत्मचरित्राचे नेमके नाव 'आमच्या आयुष्यातील आठवणी' नसून 'आमच्या आयुष्यातील काही आठवणी' असे आहे.

**विरामचिन्हे :** पूर्णविराम, स्वल्पविराम, संयोगचिन्ह, अवतरणचिन्ह इ० सर्वच विरामचिन्हांच्या उपयोगात अगणित चुका झाल्या आहेत.

प्रस्तुत पाठ्यपुस्तकातील इतक्या विविध प्रकारच्या चुका पाहता, हे पाठ्यपुस्तक म्हणजे मराठीत किती प्रकारच्या चुका करता येऊ शकतात याचा एक नमुनाच आहे, असे खेदाने म्हणावेसे वाटते. कोणतेही पुस्तक, विशेषतः विद्यार्थ्यांना शिकवायचे पाठ्यपुस्तक हे जास्तीत जास्त निर्दोष असणे अत्यंत गरजेचे आहे, या महत्त्वाच्या बाबीकडेच या पुस्तकाच्या निर्मितीत संपूर्ण दुर्लक्ष झाले आहे, आणि ते अक्षम्य आहे.

■

२/४, विसावा हाइट्स, डी.पी.रोड, औंध, पुणे 411 007.
दूरध्वनी - 25884472

---

## संदर्भ कसे द्यावेत ?

संदर्भ देण्याची नवी, सोयीस्कर व जागेचा अपव्यय टाळणारी पद्धत पुढे दिली आहे. या पद्धतीचाच लेखकांनी आपल्या लेखात उपयोग करावा : लेखात ज्या ठिकाणी संदर्भ द्यावयाचा असेल तेथ कंसामध्ये संबंधित पुस्तक-लेखकाचे नाव द्यावे आणि त्यापुढे संदर्भित पुस्तक/लेखाचे प्रकाशनवर्ष द्यावे. त्यानंतर, आवश्यक असल्यास, स्वल्पविराम देऊन पृष्ठक्रमांक लिहावा व कंस पुरा करावा. लिखाणाच्या अखेरीस 'संदर्भसूची'मध्ये संदर्भातील सर्व तपशील द्यावेत. सूचीतील प्रत्येक नोंदीतील तपशिलांचा क्रम साधारणपणे असा ठेवावा : लेखकाचे आडनाव, स्वल्पविराम, नावांची आद्याक्षरे, प्रकाशनवर्ष, ग्रंथाचे शीर्षक, पूर्णविराम, प्रकाशनसंस्था, स्वल्पविराम, प्रकाशनस्थळ, पूर्णविराम. संदर्भसूची मराठीच्या वर्णक्रमानुसार असावी.

---





अनुक्रमणिका

पुस्तक-परीक्षण

# सिंधी कथांचा रोचक अनुवाद

न. म. जोशी

[परीक्षित पुस्तक : 'अनाहूत आणि इतर सिंधी कथा', अनुवादक व प्रकाशक : लछमन हर्दवाणी, 'कविता' प्रोफेसर कॉलनी, सावेडी, अहमदनगर, पृष्ठे १२८, किंमत -विनामूल्य ]

प्रा. लछमन हर्दवाणी हे अभ्यासू व उद्यमशील लेखक आहे. मातृभाषा सिंधी असलेले हर्दवाणी मराठी व हिंदी या भाषांचेही जाणकार आहेत. 'अनाहूत' या कथासंग्रहात हर्दवाणी यांनी केलेला सिंधी साहित्यातील १८ श्रेष्ठ (त्यांच्या मताने) सिंधी लेखकांच्या कथांचा अनुवाद अंतर्भूत आहे. अमरलाल हिंगोरानी, कीरत बाबाणी, गोवर्धन भारती, मोहन कल्पना, गुनो सामतानी, इ० नामवंत सिंधी कथाकारांच्या कथांचे सुरस व सरल अनुवाद या संग्रहात आहेत.

लघुकथा या स्वरूपातील सिंधी कथा १९२३पासून सुरू झाली असे मानण्यात येत असले तरी त्या कथांचे स्वरूप प्रामुख्याने अनुकरणात्मक व भाषांतरीत असे होते. १९२५ ते १९४० या कालखंडात सिंधीमध्ये भारतीय भाषांतील कथानुवादांची लाट आली. त्याचप्रमाणे सिंधी लेखकांना इंग्रजी कथांच्या अनुवादामुळे लघुकथेचे तंत्र आणि मंत्र अवगत होऊन पुढे सिंधीमध्ये चांगल्या कथा निर्माण झाल्या. १९६० नंतर सिंधी कथेने चांगले कसदार वळण घेतले. फाळणीच्या कथा आणि व्यथा सिंधी कथेत अवतरल्याच, पण त्यानंतरच्या काळातील सिंधी समाजाच्या आशा-आकांक्षा, आर्थिक पराक्रम, सामाजिक घुसमट, मातृभूमीचं प्रेम या सर्व भावभावना सिंधी कथेत सकसपणे येत गेल्या. अशा सर्व प्रवाहांचा व कालखंडांचा प्रातिनिधिक विचार करून श्री. हर्दवाणी यांनी गेल्या ५० वर्षांत लिहिल्या गेलेल्या निवडक २० सिंधी कथा या संग्रहात सादर केल्या आहेत.

श्री. कृष्ण खटवाणी यांची 'अनाहूत' ही या संग्रहातील सहावी कथा आहे. या संग्रहाला 'अनाहूत' हेच नाव लेखकाने का दिले हे मात्र पुरेसे स्पष्ट होत नाही. सर्वच कथा प्रातिनिधिक या दृष्टीने चांगल्या असल्या तरी 'अनाहूत' या कथेपेक्षा कितीतरी

सरस व  सकस कथा या संग्रहात आहेत. 'अनाहूत'नंतरची सात क्रमांकाची गोवर्धन मेहबूवाणी भारती यांची 'नवे नाते' ही कथा अधिक सशक्त, आशयघन, शैलीदार अशी आहे. अनाहूत याचा रूढ अर्थ अनिमंत्रित, आगंतुक असा आहे. या कथेतील कथाबीज म्हणजे नको असलेला गर्भ. हे नको असणं आगंतुकतेपेक्षा अधिक दाहक, अधिक बोचरं असं आहे.

यातील अनेक कथांमध्ये सिंधी समाज, संस्कृती, रूढी, चालीरीती, सणवार, उत्सव, खाण्यापिण्याचे पदार्थ, संवयी अशा अनेक घटकांद्वारा सिंधी भावजीवनाचा सुंदर आलेख आढळतो. असे असले तरी सिंधी लेखकांच्या अनुभवविश्वाच्या काही मर्यादाही सहजी जाणवतात. ग्रामीण वा दलित जीवनाचे चित्रण सिंधी कथांमध्ये अभावानेच आढळते. याचे एक कारण असे असावे, की बहुतेक सर्व सिंधी लेखक हे नागर आहेत. सिंध प्रांतात ते होते तेव्हा काय तो त्यांचा गावाशी (गोठु) संबंध आला. अर्थातच ही मर्यादा लक्षात घेतली तरीही सिंधी लेखकांचे आपल्या अनुभवाशी इमान लक्षणीय आहे.

ललितसाहित्याच्या अनुवादाबाबत असे म्हटले जाते, की स्वतंत्रलेखनापेक्षा अनुवाद अवघड. एका भाषेतील शब्दांच्या अर्थच्छटा, ध्वनी दुसऱ्या भाषेत जसेच्या तसे उतरविणे हे सहजसाध्य नसते. भाषा आणि संस्कृती यांचा परस्परसंबंध लक्षात घेता, आशय भाषेद्वारा आविष्कृत होतो तेव्हाच संस्कृतीची सूत्रे ध्वनित होत असतात. या संग्रहातही अशा अनेक जागा सापडतात. खरं तर अनुवादकाची मातृभाषाच सिंधी आहे. तेव्हा त्यांच्या बाबतीत ही अडचण यायला नको होती. तरीही अनेक ठिकाणी मराठी अनुवाद वाचताना सुग्रास भोजनात खडा लागावा तसे वाटते–

उदा० माझं मन माझ्या <u>वशात</u> नाही हे नक्की. (पृ. २९)

प्रेमाची <u>मंझिल</u> प्राप्त होण्याची अशा वाटत नाही. (पृ. २९)

सुधा लोकगीतांचा रिकार्डिंग संपवून चार दिवसांनंतर परतली. (पृ. १२१)

सुधा आता निर्मलच्या कॉटेजमध्ये आपलं अस्तित्व कायम करून चुकली होती. (पृ.१२१)

'ढेमसे' हा पदार्थ मराठी माणसांना मुळीच माहीत नाही. हे ढेमसे कशाचे करतात ? अशा उल्लेखांबाबत असे धोरण असावे की तोच शब्द वापरण्याचा आग्रह असेल तर कोणत्या ना कोणत्या स्वरूपात, संवादमाध्यमातून त्याचे स्पष्टीकरण आपोआपच मिळेल. नाहीतर पुस्तकाच्या शेवटी किंवा तळटिपा म्हणून अशा शब्दांचे स्पष्टीकरण द्यावे लागेल. पण तसे करणे कदाचित रसभंग ठरू शकेल. '' 'धर्म आणि मजहब'च्या नावावर लोकांची दिशाभूल करण्यात आलेली आहे,'' असे वाक्य एका

कथेत आढळते. वास्तविक धर्म हा एका भाषेतला शब्द आणि मजहब हा दुसऱ्या भाषेतला शब्द एवढाच फरक. पण मूळ संज्ञा-संकल्पना एकच. असं असताना सामान्य वाचकाला असे वाटणार की धर्म आणि मजहब काही वेगळे आहेत. अशा पद्धतींचे उल्लेख निसटते असले तरी त्यावरून अर्थ निसरडा होऊन वाचक घसरण्याची शक्यता जास्त असते.

''मुजाहिर यांनी भरलेली आगगाडी लारकाना स्टेशनवर थांबली.''...असे वाक्य एका कथेत आहे. मुजाहिर हे सिंधी मुसलमानांचे नाव आहे. पण या कथेत याबद्दलचे स्पष्टीकरणात्मक उल्लेख बऱ्याच विलंबाने येतात.

अशा काही अपवादात्मक त्रुटी लक्षात घेतल्या तरी श्री. हर्दवाणी यांनी या कथा संग्रहाच्या रूपाने सिंधी कथांचा सरस अनुवाद केला आहे यात शंका नाही. सिंधी ही तशी दुर्लक्षित भाषा आहे. या भाषेला न्याय देण्याच्या दृष्टीनेही हे कार्य प्रशंसनीय आहे.

■

१०१३, सदाशिव पेठ, गंधाली, नागनाथपार रस्ता, पुणे 411 030.
दूरभाष (020) 24476868 भ्रमणध्वनी 9226575290

---

**परीक्षणासाठी आलेली पुस्तके**

- 'रवीन्द्र गीतिमाल्य'- डॉ. राम म्हैसाळकर, प्रकाशक : भवान म्हैसाळकर, नागपूर, पृष्ठे १८९, किंमत रु. १५०/-
- 'रवीन्द्र गीतालि' - डॉ. राम म्हैसाळकर, प्रकाशक : भवान म्हैसाळकर, नागपूर, पृष्ठे १५६, किंमत रु. १२५/-
- 'पाढा' (कवितासंग्रह ) - केशव सखाराम देशमुख, साक्षप्त प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे ९६, किंमत रु. १००/- प्रकाशन वर्ष २००६
- 'तुर्की कविता : प्राचीन आणि अर्वाचीन' अनुवादक - भगवान ठग. महाराष्ट्र अनुवाद परिषद, बुलडाणा. प्रकाशन वर्ष २००६

---

पुस्तक-परीक्षण

# संशोधकांचा वाटाड्या

विजया चौधरी

[परीक्षित पुस्तक : 'शोधनिबंधाची लेखन पद्धती', स.गं.मालशे, सुधारित आवृत्ती व संपादन : मिलिंद मालशे, लोकवाङ्मय गृह, मुंबई. २००६, पृ. ६७, किंमत रु. ६०/-]

'शोधनिबंधाची लेखनपद्धती' ही स.गं.मालशे यांची १९७५ साली प्रसिद्ध झालेली पुस्तिका मराठीच्या अभ्यासकांना परिचयाची आहेच. ही पुस्तिका नवसंशोधकांसाठी मार्गदर्शक ठरलेली आहे व अजूनही ठरत आहे. याचमुळे,डॉ. मिलिंद मालशे यांनी या पुस्तिकेची सुधारित द्वितीय आवृत्ती संपादित केली आहे.

मूळ पुस्तिकेमध्ये नवख्या प्रबंधलेखकांसाठी संशोधन पद्धतीविषयीचे तंत्र सांगितलेले आहे. आज ३० वर्षांनंतरही हे तंत्र कालबाह्य झालेले नाही. संशोधन विषयाच्या निवडीपासून ते संदर्भशोधन, टिपणे काढण्याची पद्धत, संदर्भसाधनांचा वापर, संदर्भप्रक्रिया, संशोधनाची मांडणी अशा अनेक अंगांचा व्यावहारिक दृष्टिकोणातून या पुस्तिकेत विचार केलेला आहे. डॉ. मिलिंद मालशे यांनी त्यात भर घालताना कालपरत्वे बदलत गेलेल्या व संगणकक्रांतीमुळे उपलब्ध झालेल्या नवीन माहितीस्रोतांचा विचार केलेला आहे. जुन्या तालिकापद्धतीबरोबरच संगणकीय संकेत स्थळांचा वापर करणे, टिपणे काढण्यासाठी पुठ्ठिकांचा वापर करण्याबरोबरच संगणकावर संरचित स्वरूपाची मजकूर - चौकट किंवा 'टेम्प्लेट्स्' तयार करणे, टिपा व तळटिपा देण्यासाठी 'वर्ड'प्रणालीचा उपयोग करणे असे अनेक नवे आयाम सुचवलेले आहेत.

आंतरराष्ट्रीय पातळीवर प्रसिद्ध होणाऱ्या संशोधनासाठी सामाजिक व वैज्ञानिक संशोधन संस्थांनी काही संकेत निश्चित केलेले आहेत. संशोधन-साधनांची नोंद करण्यासाठी ते उपयुक्त आहेत. त्यांचीही माहिती डॉ. मालशे यांनी या पुस्तिकेत दिलेली आहे. या माहितीच्या वापरासाठी काही विशिष्ट पातळीपर्यंत संगणकीय ज्ञान अभ्यासकाला असणे आवश्यक आहे.

मात्र, मराठीच्या अभ्यासकाला या सुविधांचा लाभ घेण्यासाठी, विविध संकेतस्थळांवर, आंतरराष्ट्रीय मानदंडांनुसार, शास्त्रीय पद्धतीने माहितीसाठे उपलब्ध होणे अत्यंत आवश्यक आहे. पुस्तिकेत दिलेले काही वेधयंत्रणांचे संगणकीय पत्ते स्पेलिंगची लागणारी अचूकता लक्षात घेता रोमनलिपीमध्ये देणे फायद्याचे ठरले असते. एकंदरीत, एम्.फिल्,पीएच्.डी.च्या विद्यार्थ्यांसाठी ही पुस्तिका उपयुक्त ठरेल यात शंका नाही.

■

ई-५०३, गार्डन व्ह्यू, राधिका सोसायटी, पर्वतीनगर, सिंहगड रोड,
पुणे 411 030.

---

**परिषद-वार्ता**

# महाबँक भाषाविषयक लेखन पुरस्कार

'मराठी अभ्यास परिषदे'तर्फे 'बँक ऑफ महाराष्ट्र'च्या सहकार्याने देण्यात येणाऱ्या 'महाबँक भाषाविषयक लेखन पुरस्कार' (रु. ५,०००/-) २००६ या साठी 'शब्दानुबंध' : लेखक - प्रा. शंकर सखाराम, मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई, या पुस्तकाची निवड करण्यात आली आहे. जानेवारी महिन्यात पुणे येथे पुरस्कार-वितरण-समारंभ होईल.

परीक्षकांच्या समितीत डॉ. मृणालिनी शहा, डॉ. शर्मिष्ठा खेर, डॉ. सुमन बेलवलकर व डॉ. सुप्रिया सहस्रबुद्धे (निमंत्रक) ह्यांनी काम पाहिले.

■








## शंका...

--

प्रशान्त बागड

१. 'मी काल एक खुर्ची आणि एक टेबल विकत...(घेतले/घेतलं/घेतली).

ह्या वाक्यात नक्की कोणतं क्रियापद वापरावं ? दोन्ही वस्तूंसाठी मिळून अनेकवचनी (ते कोणतं ?) की दुसऱ्या वस्तूच्या लिंगानुसारचं एकवचनी क्रियापद? सामान्यतः दुसरा पर्याय निवडला जातो. पण यात 'मी काल एक खुर्ची' हा वाक्यखंड अधांतरी राहिल्यासारखा वाटतो. मात्र क्रियापद अकर्मक असेल तर क्रियापदाच्या अनेकवचनी रूपाची निवड सोपी आणि निःशंक वाटते. उदा० 'तो आणि ती गेले(त).'

२. 'मी मनोज आणि नितीनला सांगितले.'

या वाक्यात 'मी मनोज' हा वाक्यखंड अधांतरी राहिल्यासारखा भासतो; 'ला' हा प्रत्यय 'मनोज'लाही लागतोच असं निःसंदिग्धपणे वाटत नाही. शिवाय 'मी, मनोज आणि नितीन यांना सांगितले' ही रचना व्याकरणदृष्ट्या निर्दोष असूनही भलतीच औपचारिक व कोरडी वाटते. या धाटणीची वाक्यं कशी लिहावीत ?

३. 'मी काल ते पुस्तक – धार आणि काठ – आणलं असं लिहावं की 'मी काल ते पुस्तक, धार आणि काठ, आणलं' असं ? डॅश वापरावा की स्वल्पविराम ?

४. (अ) 'हा विचार, माझ्या मते तरी, विचित्र आहे.' ही इंग्रजी धर्तीची रचना मराठीतही चांगली वाटते. ती बरोबर आहे का ? ह्या वाक्यात स्वल्पविरामच रास्त आहे की डॅशची योजना करावी ?

(ब) 'कॉलिंगवुडच्या ह्या मताचा, वरील मुद्दे लक्षात घेता, असा अर्थ होत नाही की...' ह्या वाक्याचा आरंभ 'वरील मुद्दे लक्षात घेता' ह्या पदबंधाने करणे शक्य असूनही अशी इंग्रजी धर्तीची रचना कधीकधी करावीशी वाटते. कारण, अशा रचनेमुळे युक्तिवादाचा ओघ जास्त सलग वाटतो. असे करणे बरोबर आहे का ?

मराठी विश्वकोशात अशा काही रचना आढळतात : (१) ''विसाव्या शतकातील श्रेष्ठ, कदाचित सर्वश्रेष्ठ, पाश्चात्य तत्त्ववेत्ते.'' (खंड १४, पृष्ठ ५८५). (२) बहुतेक







जाती, निदान, अंशत:, वृक्षवासी असतात पण थोड्या भूचर किंवा खडप्यांवर राहणाऱ्या असतात.'' (खंड ३, पृष्ठ २९३).

५. 'हुषार निलेश आणि रमेश' यात हुषार हे विशेषण दोघांसाठी योजलेले आहे हे नेहमीच नि:संदिग्धपणे कळते का ? की त्याचा अर्थ 'हुषार निलेश' आणि 'रमेश' असा होतो ? ही संदिग्धता टाळण्यासाठी 'हुषार निलेश आणि हुषार रमेश' अशी रचना केल्यास ती फाफटपसाऱ्यासारखी वावगी वाटते.

६. 'हे बरोबर आहे का ? असा प्रश्न मला पडतो.' हे एक वाक्य आहे की ही दोन वाक्यं आहेत ? एकच असेल तर मधलं प्रश्नचिन्ह विचित्र वाटतं. कारण प्रश्नचिन्हानिशी वाक्य पूर्ण होतं. म्हणून 'हे बरोबर आहे का, असा प्रश्न मला पडतो' असं मला जास्त योग्य नि सुटसुटीत वाटतं. ते चुकीचं आहे का की बरोबर आहे की ती खरोखर जास्त चांगली लेखनरीत आहे ?

७. 'तो प्रत्यक्ष आला नाही; मात्र त्याचं पत्र आलं.'

ह्या वाक्यातील अर्धविराम पूर्णत: रास्त वाटतो. समसमान महत्त्व असलेले दोन वाक्यखंड थोडा विराम घेऊन पण त्यांच्यातील विरोध लक्षात येईल, आणि एक संकीर्ण अर्थ तयार होईल ह्या बेताने जोडलेले आहेत. परंतु.

'त्याने तिला फसवलं म्हणून; त्याची आईही त्याच्या कारस्थानात सामील म्हणून; तिला बाहेरून काहीच मदत मिळाली नाही म्हणून; तिची कोंडी झाली.'

हा सलग प्रवाह स्वल्पविरामांनी जोडावा असं मला वाटतं. कारण हे वाक्यखंड सारख्याच महत्त्वाचे पण नाहीत; एकाच प्रवाहाचे लहान-लहान घटक आहेत. शिवाय साखळीतल्या शेवटच्या वाक्यखंडानंतर दिलेला अर्धविराम तर मला काही कारणास्तव विचित्र वाटतो. त्याच्या आणि शेवटच्या तुकड्यादरम्यान विराम नाही वा नको असं वाटतं. तर अशा वाक्यांत स्वल्पविराम वापरावा की अर्धविराम ?

■

द्वारा - श्री. शरद सोमण, १४११, शुक्रवार पेठ, पुणे 411 002.

**महत्त्वाची सूचना :**

'भाषा आणि जीवन'च्या वार्षिक वर्गणीदारांची नव्या वर्षाची वर्गणी पाठवावी. वर्गणीचे तपशील आवरणपृष्ठ 'तीन'वर आहेत.





अनुक्रमणिका

लेखक-परिचय

- **डॉ. कृष्ण श्री. अर्जुनवाडकर** - जन्म १९२६. अद्वैत-वेदान्त-कोविद ही पदवी १९४१मध्ये. १९४६च्या शालान्त परीक्षेत जगन्नाथ शंकरशेठ शिष्यवृत्ती. संस्कृत विषयात एम.ए., स.प. महाविद्यालयात संस्कृतचे १८ वर्षे अध्यापन. मुंबई विद्यापीठात सात वर्षे मराठीचे प्रपाठक. परदेशातही अध्यापन. मम्मटकृत 'काव्यप्रकाश' व मोरो केशव दामलेकृत 'शास्त्रीय मराठी व्याकरण' या ग्रंथांचे सटीक, चिकित्सक संपादन. 'मराठी व्याकरण : वाद आणि प्रवाद', 'मराठी व्याकरणाचा इतिहास', 'मोरो केशव दामले : व्यक्ति आणि कार्य' इ० अनेक ग्रंथ प्रकाशित. साहित्यसम्राट न.चिं. केळकर पारितोषिक, पाणिनी पुरस्कार, कालिदास पुरस्कार, बेहेरे सुवर्णपदक इ० अनेक पुरस्कारांनी सन्मानित.
- **उमाकांत रामचंद्र कामत** - मुंबई विद्यापीठातून मराठीमध्ये एम.ए.,बी.एड. अलिबागच्या महाविद्यालयातून निवृत्त. 'महाराष्ट्र टाइम्स', व शैक्षणिक नियतकालिकांतून भाषाविषयक लेख, टिपणे, पुस्तक-परीक्षणे इ० लेखन.
- **विश्वनाथ खैरे** - केंद्रीय बांधकाम खात्यातून अभियंता म्हणून निवृत्त. संस्कृत, मराठी, तमिळ यांच्या आंतरसंबंधांचा विशेष अभ्यास. प्राचीन मिथ्यकथा, प्राचीन भारतीय संस्कृती व परंपरा या विषयांसंबंधी लेखन.
- **विजया नंदकुमार चौधरी** - मुंबई विद्यापीठातून मराठीमध्ये एम.ए., पंजाब नॅशनल बँकेतून अधिकारी-पदावरून स्वेच्छानिवृत्त, साहित्यप्रेमी भगिनी मंडळाच्या 'स्त्री-साहित्याचा मागोवा' या ग्रंथाच्या तिसऱ्या खंडामध्ये लेखिका-परिचय व ग्रंथसूचीमध्ये सहभाग.
- **डॉ. न.म. जोशी** - एम.ए., एम.एड.,पीएच.डी. टिळक शिक्षण महाविद्यालयामध्ये अध्यापन. आता निवृत्त. ५० पुस्तकांचे लेखन. महाराष्ट्र शासनाचे उत्तम वाङ्मयनिर्मितीचे तीन पुरस्कार. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या लेखनाच्या दोन खंडांचा व अनेक सिंधी कथांचा मराठीत अनुवाद. इंग्रजी, मराठी, हिंदी व सिंधी भाषांवर प्रभुत्व. १७व्या अ.भा. बालकुमार साहित्य संमेलनाचे अध्यक्ष. पहिल्या कोयना साहित्य संमेलनाचे अध्यक्ष. अनेक साहित्यपुरस्कार.
- **डॉ. ब्रह्मानंद देशपांडे** - महामहोपाध्याय, विद्याभूषण, प्राचीन मराठी वाङ्मयाचे व्यासंगी संशोधक. 'देवगिरीचे यादव', 'शोधमुद्रा' इ० पुस्तके प्रकाशित.
- **डॉ. माणिक धनपलवार** - उस्मानिया विद्यापीठ, हैदराबाद येथील मराठीचे (निवृत्त) प्राध्यापक.
- **प्रशांत बागड** - एम.ए. (तत्त्वज्ञान). युनिव्हर्सिटी ऑफ साउदॅम्प्टन, इंग्लंड येथे 'साहित्याचे तत्त्वज्ञान' ह्या विषयावर पीएच.डी. प्रबंधलेखन चालू. विलास सारंगांच्या काही इंग्रजी कथांचा मराठीमध्ये अनुवाद. कथा, कविता, समीक्षा इ० लेखन विविध नियतकालिकांतून प्रसिद्ध.
- **डॉ. सुभाष भेंडे** - कीर्ती महाविद्यालय, मुंबई येथून अर्थशास्त्राचे प्राध्यापक म्हणून, अ.भा. मराठी साहित्य संमेलनाचे माजी अध्यक्ष, अनेक कादंबऱ्या, कथासंग्रह इ०. प्रकाशित. मराठी विश्वकोश व अन्य ठिकाणी अर्थशास्त्रासंबंधी लेखन व संपादन.
- **डॉ. मिलिंद मालशे** - आय.आय.टी.(मुंबई) येथे इंग्रजीचे प्राध्यापक. मराठी व इंग्रजीमधून लेखन. पीएच.डी.चे मार्गदर्शक, परीक्षक. अनेक विद्यापीठांच्या निवड समित्या, अभ्यासमंडळे यांचे सदस्य. भाषाविषयक सौंदर्यशास्त्र या विषयांचे अध्यापन. 'आधुनिक भाषाविज्ञान : सिद्धांत आणि उपयोजन'सह अनेक मराठी व इंग्रजी पुस्तके प्रकाशित. हिंदुस्थानी शास्त्रीय संगीताचे अभ्यासक व गायक.

- **वासुदेव सोमाजी वले** - मराठी विषयात एम.ए., बी.एड., पाचोरा येथील श्री.शेठ मु. मा. महाविद्यालयात मराठीचे अध्यापन.
- **डॉ. मृणालिनी शहा** - एम.ए.,पीएच.डी.(मराठी). मॉडर्न महाविद्यालय (गणेशखिंड) येथे मराठीचे अध्यापन. मराठी अभ्यास परिषदेच्या कार्यकारिणीच्या व 'भाषा आणि जीवन'च्या संपादक-मंडळाच्या सदस्य.
- **यास्मिन शेख** - मराठी व इंग्लिश या विषयांत एम.ए.,बी.टी.,एस.आय.इ.एस. महाविद्यालय, मुंबई येथील मराठीच्या निवृत्त प्राध्यापक, आय.ए.एस.च्या विद्यार्थ्यांना मराठीच्या व्याकरणाचे १० वर्षे अध्यापन, बालभारतीच्या मराठीच्या पाठ्यपुस्तकाचे सहसंपादन. 'मराठी लेखन मार्गदर्शिका' प्रकाशित, 'मराठी शब्द लेखनकोश' प्रकाशनाच्या मार्गावर. 'अंतर्नाद' मासिकाच्या व्याकरण-सल्लागार. विविध नियतकालिकांतून ललितलेखन.
- **डॉ. सुप्रिया सहस्रबुद्धे** - इंग्लिश या विषयात एम.ए., पीएच.डी. मॉडर्न महाविद्यालय (गणेश-खिंड, पुणे) येथे अधिव्याख्याता. 'आदिमाया' (मीरा तारळेकर) या मराठी कवितासंग्रहाचा हिंदीमध्ये व 'हिंदुत्व' (ज्योतिर्मय शर्मा) या पुस्तकाचा इंग्रजीतून मराठीमध्ये अनुवाद. अमर्त्य सेन यांच्या पुस्तकाचा अनुवाद प्रकाशनाच्या मार्गावर.

**दिवाळी २००६(अंक २४.४)मधील लेखक**

- **डॉ. कैलास सार्वेकर** - एम.ए.,पीएच.डी. (पुणे विद्यापीठ) नवापूर (जि.नंदुरबार) येथील महाविद्यालयात मराठीचे प्रपाठक व विभागप्रमुख. का.स. वाणी मराठी प्रगत अध्ययन संस्थेचे(धुळे) मानद संचालक. त्याच संस्थेच्या 'आमची श्रीवाणी' या नियतकालिकाचे सहसंपादक. एम.फील. व पीएच.डी.चे मार्गदर्शक. 'मराठी ग्रामीण कवितेचा इतिहास', या पुस्तकास रोहमारे प्रतिष्ठानचा उत्कृष्ट समीक्षा पुरस्कार. बालभारतीच्या मराठीच्या पाठ्यपुस्तकाचे सहसंपादक. 'कथामाला', 'विचारवैभव' व 'ललित-गद्यलेणी' या उत्तर महाराष्ट्र विद्यापीठाच्या पाठ्यपुस्तकांचे संपादन/सहसंपादन. 'वेध : तळ्यातल्या साउल्यांचा' व 'तहान : स्वरूप आणि समीक्षा' ह्या पुस्तकांचे संपादक.

---

(१) वार्षिक वर्गणी भरण्यासाठी पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असे आहे. वार्षिक वर्गणी - संस्थेला रु. १२५/-, पंचवार्षिक वर्गणी रु. ५५०/-, व्यक्तीला रु. १००/-, पंचवार्षिक वर्गणी रु.४५०/- परदेशात अंक पाठविण्यासाठी टपालखर्च रु. १००/- अधिक.

(२) मराठी अभ्यास परिषदेची **आजीव सदस्यत्व (फक्त व्यक्तींसाठी) वर्गणी रु. १,००० आणि नोंदणी शुल्क रु. १००/-.** आजीव सदस्यांना 'पत्रिकेचा'चा अंक पाठवला जातो.

(३) **पैसे भरण्याबद्दल सूचना :** वर्गणी प्रत्यक्ष. रोखीने. किंवा धनादेशाने देता येईल. **कृपया मनिऑर्डर पाठवू नये.** पाठवल्यास आपला पत्ता न विसरता लिहावा. धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. **धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत रुपये २०/- वटणावळ अधिक घालावी.** धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे.

(४) **जाहिरातीसाठी नवे दर :** पूर्ण पान रु.२,५००/-. अर्धे पान रु.१,५००/-. पाव पान रु.८००/-. शुभेच्छा रु.४००/-. आवरण पृष्ठ तीन रु. ३,०००/- जाहिरात मराठीत असल्यास उत्तम. हिंदीत. इंग्रजीत असल्यास चालेल.

---

अनुक्रमणिका





मोरो केशव दामले (१८६८-१९१३) व्याकरणकार व व्याकरणातील विवाद्य प्रश्नांचे चर्चक शास्त्रीय मराठी व्याकरणाचे ग्रंथकार म्हणून ज्ञात.

बुकपोस्ट - बुकपॅकेट - त्रैमासिक
R. N. I. नोंदणी क्रमांक : ०-४००४८/८३



प्रेषक
कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद
३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर, गल्ली क्र.५
वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११ ००२. (दू. क्र. २४४८६०१५)